


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)







महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत**.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ५१ । अंक ५ । फेब्रुवारी १९९८
माघ-फाल्गुन, शके १९१९
किंमत रु. १५/-
**वार्षिक वर्गणी रु. १६०/-**



## *नवभारत*ची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संगृहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील अशी काळजी घेतली जाईल.

* *नवभारत*, ऑक्टोबर, १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.

**प्राज्ञपाठशाळामंडळ**
**अध्यक्ष व विश्वस्त :**
मे.पुं. रेगे

**संपादक :**
वसंत पळशीकर

**साहाय्यक संपादक :**
अ.र. कुलकर्णी, एस्.डी. इनामदार,
अ.ना. ठाकूर

**संपादकीय पत्रव्यवहार :**
वसंत पळशीकर
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा).

**व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :**
श्री.ग. दीक्षित
व्यवस्थापक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळामंडळ, ३१५ गंगापुरी,
वाई – ४१२ ८०३ (जि. सातारा)



अनुक्रमणिका







# नवभारत

## अ नु क्र म



मुखपृष्ठ : सुजित पटवर्धन

अनुक्रमणिका

संपादकीय

# भारतीय राजकारणातील नव्या पर्वाचा आरंभ

श्री. पी.व्ही. नरसिंह राव यांच्या पंतप्रधानकीच्या कारकीर्दीत श्री. मनमोहन सिंग यांच्या पुढाकाराने नव्या आर्थिक धोरणांचा अंगीकार केला गेला. पं. नेहरूप्रणीत मिश्र अर्थव्यवस्थेच्या चौकटीत आर्थिक क्षेत्रात भारताने मोठी कामगिरी पार पाडली. पण शासनाचे नियंत्रण, सार्वजनिक क्षेत्रातील अकार्यक्षम व्यवहार, अतिरेकी सरकारीकरण व त्यामधून वाढलेला व सहन न होणारा आर्थिक भार, भांडवलदार-उद्योजक, संघटित क्षेत्रातील कर्मचारी व कामगारवर्ग यांना अति-संरक्षण व त्यांची मक्तेदारी, 'लायसेन्स-परमिट राज' खाली माजलेला भ्रष्टाचार, 'कमीत कमी काम व जास्तीत जास्त दाम' या न्यायाचा सार्वत्रिक फैलाव, नाना सबसिड्यांवरील वाढते अवलंबन अशा अनेकविध कारणांनी भारत दिवाळखोरीच्या कड्याच्या टोकावर येऊन पोचला होता. या सर्व काळात आपले परावलंबन कमालीचे वाढत गेले होते. इतके की, जागतिक अर्थव्यवस्थेचे संचालन व नियमन करणाऱ्या जागतिक संस्था, आर्थिक महासत्ता व बहुराष्ट्रीय कंपन्या यांना न जुमानता आमचे चालणार नव्हते. वस्तुस्थिती अशी होती की, जागतिक दबाव नसता तरी अर्थव्यवस्था 'खुली' करणे, शासकीय नियंत्रणे व नियमन कमी करणे, सबसिड्यांमध्ये कपात करणे, भाववाढ होऊ देणे, अतिसंरक्षण व मक्तेदारी यांवर प्रहार करणे या दिशेने पावले टाकावीच लागली असती. ती वेळीच टाकली गेली, असा निर्वाळा इतिहास कालांतराने देईल, व मनमोहन सिंग-नरसिंह राव यांना त्याचे श्रेय दिले जाईल. तशी ती टाकली गेली नसती तर काय घडू शकले असते याची काही कल्पना सोविएत रशियाचे आतून कोसळणे पाहून करता येते.

नरसिंह राव व मनमोहन सिंग यांच्या जोडीला सत्तेवरून पदच्युत केले ते काँग्रेसमधीलच 'असंतुष्ट आत्म्यां'नी. नरसिंह रावांवर फार मोठा अन्याय झाला असे म्हणण्याचे काहीच कारण नाही. रामजन्मभूमी-बाबरी मशीद प्रकरणी वेळीच राजकीय तोडगा त्यांनी काढला नाही; त्याही पलीकडे, उत्तर प्रदेशमधील कल्याण सिंह यांचे भाजप सरकार मशीदप्रकरणी आपला शब्द पाळणार नाही हे स्पष्ट दिसत असूनही, त्यांनी देशाचा पंतप्रधान या नात्याने जोखीम पत्करून खंबीरपणे कर्तव्यपालन केले नाही. (ही गोष्ट त्यावेळचे गृहसचिव श्री. माधवराव गोडबोले यांच्या *द अनफिनिश्ड इनिंग्ज* या पुस्तकातून स्पष्ट होते.) मुद्दा असा की, नरसिंह रावांच्या हातातील नेतृत्व काँग्रेसमधील त्यांच्या विरोधकांनी अशा वेळी व अशा पद्धतीने काढून घेतले की, भारतीय राजकारणाच्या एका प्रदीर्घ पर्वाचा शेवट घडवून आणण्यात काँग्रेसनेच पुढाकार घेतला असे झाले.

कोणते पर्व समाप्त होत आहे याचे दिग्दर्शन १९९६ सालच्या निवडणुकांनी केले. भाजपच्या नेतृत्वाखाली केंद्रात प्रथमच सरकार स्थापन झाले. ते केवळ काही दिवसच टिकले, ही गोष्ट खरी. पण त्या सरकारची जागा घेतलेले, चौदा पक्षांच्या आघाडीचे सरकार पहिल्या दिवसापासूनच 'ऑक्सिजन'च्या कृत्रिम पुरवठ्यावर अवलंबून होते. देवेगौडांचे पंतप्रधान होणे, आणि नंतर त्यांना हटविले जाऊन गुजराल यांना पंतप्रधानपदी बसविले जाणे या सर्व प्रकारामधून आघाडीचे दुबळेपण व क्षणभंगुरत्व उघडच झाले. एक पर्व समाप्त व्हावे ही ऐतिहासिक नियतीच होती, आणि ती कदाचित भारतीय लोकशाहीची एक ऐतिहासिक गरजही होती. श्री. सीताराम केसरी यांचे ऐतिहासिक कार्य बहुधा हेच होते.

– २ –

लोकसभेत आपणास निर्विवाद बहुमत मिळणार नाही याबद्दल निवडणुकांच्या रिंगणात उतरत असतानाच सर्वच प्रमुख राजकीय पक्षांची खात्री; आणि या ना त्या आघाडीचे सरकार हेच यापुढे काही काळ तरी भारतीय राजकारणाचे वैशिष्ट्य राहील याविषयीही सर्व प्रमुख पक्षांची कबुली हे या वेळच्या निवडणुकीचे खास वेगळेपण म्हणावयास हवे. आघाडीचे सरकार हे अस्थिर ठरण्याची शक्यता जास्त, आणि देशाच्या भल्याच्या दृष्टीने ठोस धोरणे अंगिकारण्याच्या दृष्टीने तडजोड व सौदेबाजीवर उभारलेली आघाडी ही अडसर असेल, ही आजवर मान्यता होती. आज, आमची आघाडी ही दूरदृष्ट्या हितकारक भूमिका, धोरणे व ठोस कार्यक्रम यांवर आधारित स्थिर सरकार देऊ

शकेल, इतर कोणतीही आघाडी देऊ शकणार नाही, हाच दावा सर्व पक्ष करीत आहेत, हादेखील या निवडणुकीचा वेगळा विशेष आहे.

पं. नेहरू-इंदिरा गांधी यांच्या घराण्याच्या लोकमानसावरील प्रभावाचीही या निवडणुकीत परीक्षा होणार आहे. पं. नेहरूंनी स्वतःच्या कन्येस – इंदिरा गांधींना – राजकारणात पुढे आणले आणि काँग्रेसच्या नेतृत्वाच्या वरिष्ठ वर्तुळात त्यांना स्थान मिळवून दिले, ही गोष्ट खरी. पण काँग्रेस संघटनेतील अन्य ज्येष्ठ नेत्यांनी त्यांचा स्वीकार केला नाही, आणि या मुद्यावरून काँग्रेसची दोन शकलेही झाली हे लक्षात घेतले पाहिजे. सांगण्याचा मतलब हा की, १९६६ ते १९७०-७१ या काळात हिकमती राजकारण करून इंदिरा गांधींनी प्रथमतः काँग्रेस संघटनेवर आपली पकड जमविली व पक्षांतर्गत विरोधकांना नामोहरम केले, आणि नंतर भारतीय जनतेमध्ये स्वतःचा करिश्मा निर्माण केला. इंदिरा गांधी नेहरूंच्या पुण्याईच्या जोरावर व वारसदार म्हणून पंतप्रधानपदी दीर्घकाळ राहिल्या हे सत्य नाही. स्वतःच्या पश्चात् राजीव गांधींच्या हाती पंतप्रधानकी यावी यासाठी इंदिराजींचे प्रयत्न उघडपणेच चालले होते. तरी परंतु, त्यांची अनपेक्षित हत्या झाली त्यावेळी पंतप्रधानपदावर इतरांनीही दावा सांगून पाहिला होता. पण इंदिरा गांधींची पुण्याई पुष्कळ जास्त प्रमाणात राजीव गांधीच्या कारणी आली. मात्र काही वर्षांमध्येच त्यांच्या नेतृत्वाला काँग्रेसमधूनच आव्हान उपस्थित झाले. त्यांचे पंतप्रधानपदही गेले. त्यानंतर आपले आजोबा पं. नेहरू व आई इंदिरा गांधी यांच्या पावलावर पाऊल टाकून त्यांनी स्वतःचे कर्तृत्व पणाला लावून काँग्रेसचे नेतृत्व हाती घेतले. त्यांची हत्या झाली नसती तर काय घडले असते माहीत नाही; पण त्यांच्या भीषण हत्येच्या नंतर लोकांनी काँग्रेसला प्रचंड बहुमताने निवडून दिले. तात्पर्य, पं. मोतीलाल नेहरू, पं. जवाहरलाल नेहरू, श्रीमती इंदिरा गांधी व श्री. राजीव गांधी अशा चार पिढ्या सलगपणे राजकारणात सक्रिय राहिल्या आहेत; आणि त्यादेखील सर्वोच्च नेतृत्वाच्या पातळीवर. यांपैकी प्रत्येक व्यक्तीला घराण्याकडून चालत आलेल्या वारशाचा फायदा जरूर मिळाला; पण नंतर लोकशाही राजकारणाच्या रणधुमाळीत शिरून आपले स्थान टिकवावे व प्रस्थापित करावे लागले आहे. दोन व्यक्तींचे बलिदानही घडले.

'टु बी ऑर नॉट टु बी' अशा प्रकारची द्विधा मनःस्थिती संपवून श्री. राजीव गांधी यांच्या पत्नी सोनिया गांधी ऐन निवडणुकांच्या वेळी राजकारणात उतरल्या आहेत. भारतीय जनतेच्या मनात नेहरू घराण्याविषयी कमालीची आत्मीयता आहे, कौतुक आहे; आणि, राज्य करावे तर या घराण्यातील व्यक्तींनी, अशी भावनाही आहे. सोनिया गांधी यांना याचा फायदा, अर्थातच, मिळेल. याची त्यांना पुरेपूर कल्पना आहे. पण त्या 'हरि हरि' करीत खाटल्यावर बसल्या आहेत आणि मतदाररूपी देव त्यांच्या ओटीत सत्ता टाकीत आहेत, असे चित्र नाही. लोकशाहीत निवडणुका म्हणजे 'सनदशीर' साधनांचा वापर करून केलेली लढाईच असते. सनदशीर म्हणजे जे खपून जाईल ते सर्व. आपल्यासारख्या देशामध्ये तर ही प्रक्रिया आज उत्तरोत्तर अधिकाधिक निर्लज्ज, निर्घृण व प्रचंड खर्चिक बनत चालली आहे. प्रतिस्पर्धी उमेदवाराच्या अब्रूचे जमेल तेवढे व तसे धिंडवडे काढण्यावर उभारलेल्या या प्रक्रियेत सोनिया गांधी यांनाही उतरण्यावाचून गत्यंतर नाही. एसेम जोशी यांच्या भाषेत सांगावयाचे तर, 'कोळशाच्या खाणीत काम करावयाचे तर हात काळे होणारच' ही वस्तुस्थिती स्वीकारून सोनिया गांधी धुमश्चक्रीत उतरल्या आहेत. नेहरू-गांधी घराण्याच्या करिश्म्याची पकड जनमानसावर खरोखर किती आहे याची कसोटी लागणार आहे. त्याच वेळी, मतांच्या बाजारपेठेत हा करिश्मा वटविण्यासाठी सोनिया गांधींना स्वतःचे व्यक्तिमत्त्व तो करिश्मा पेलायला समर्थ असल्याचे मतदारांना पटवून द्यावे लागत आहे, याकडे दुर्लक्ष व्हायला नको. राजकारणाच्या, तेही निवडणुकांच्या धुमश्चक्रीत, एका प्रकारच्या चक्रव्यूहामध्ये, त्याचा भेद करण्याच्या कृतसंकल्पाने सोनिया गांधी शिरल्या ही गोष्ट अनपेक्षित होती. यासाठी लागणारी हिंमत, धृष्टता आणि रणनीतीची जाण त्यांनी आजच बऱ्यापैकी प्रकट केली आहे.

सोनिया गांधींच्या मोहिमेला यश येऊन काँग्रेस पक्षाला नवसंजीवन प्राप्त होईल का, बहुमत नाही तरी सर्वांत मोठा पक्ष म्हणून लोकसभेत तो स्थान प्राप्त करून घेईल का, याविषयी अंदाज वर्तविण्यात आम्हाला रस नाही. काँग्रेस पक्षाविषयी आम्हाला खास जवळीक नाही, की नेहरू-गांधी घराण्यावर निष्ठा नाही. पण, दुसऱ्या बाजूला, काँग्रेस पक्षाच्या आजच्या अवस्थेमुळे आम्ही आनंदितही नाही. काँग्रेस पक्षाची जागा घेऊ शकणारा एक समर्थ पक्ष या स्वरूपात पूर्वीचा जनता पक्ष व आजचा जनता दल संघटित न झाल्याने एक घातक अशी पोकळी निर्माण झाली आहे. भारतीय जनता पक्षाचा दावा असा आहे की, तोच एक पक्ष देशाला स्थिर



अनुक्रमणिका

सरकार देऊ शकतो – म्हणजेच ही पोकळी भरून काढू शकतो. पण हा दावा सार्थ नाही. कारणे दोन : (१) भारतीय समाजातील अ-हिंदू जमातींचा पुरेसा विश्वास या पक्षाने संपादन केलेला नाही; आणि (२) भारताच्या सामाजिक-आर्थिक पुनर्रचनेच्या संदर्भात या पक्षाजवळ स्वतःची अशी दृष्टी व दर्शन नाही. आणि या दोन मर्यादांची हा पक्षही वेगवेगळ्या प्रकारे कबुली देताना दिसतो. तेव्हा, काँग्रेस पक्षाचे जर कोणी खरोखरच पुनरुत्थान करू शकले तर त्या गोष्टीचे स्वागतच करावे अशी परिस्थिती आहे. सोनिया गांधी आजच्या काँग्रेस पक्षाला जास्त जागा मिळवून देतील असे दिसते. पण पक्षाचे समर्थ रूपात त्या पुनरुत्थान घडवून आणू शकतील ही गोष्ट आज तरी त्यांच्या आवाक्यातली नाही.

देशव्यापी संघटन असलेला व मतदारांमध्ये स्थान असलेला असा, मध्यवर्ती प्रवाह म्हणावा असा कोणताही एक मध्यममार्गी पक्ष आज अस्तित्वात नाही; अनेकानेक चिरफळ्या पडलेल्या आहेत. बऱ्याच पक्षांना स्थानिक रूप आले आहे, आणि त्यांपैकी बरेच पक्ष एका व्यक्तीच्या भोवती उभे असल्याचे दिसते. या परिस्थितीचा फायदा भारतीय जनता पक्षाला मिळत आहे. तो पक्ष ज्या 'हिंदुत्वा'च्या आवाहनावर उभा आहे त्या हिंदुत्वाच्या मांडणीला देशभर प्रतिसाद मिळाला असला तरी, समाजातील सर्वांनी विश्वासाने स्वीकार करावा या दृष्टीने 'हिंदुत्व' ही एक अनुल्लंघ्य अडचणही बनते हे या पक्षाच्या नेतृत्वाला मधून-मधून उमगते. व्यापक व सर्वसमावेशक अशी आपली भूमिका आहे असे मतदारांना पटवून देण्याचा प्रयत्न होतो. सत्ता आपल्या अगदी हाताला लागण्याइतकी जवळ आली आहे असे वाटत असल्याने, ही संधी हातची जाऊ नये म्हणून, या वेळी स्वतःची एक 'जो जे वांछील ते तो लाहो' अशी, गोलमाल, गुळगुळीत प्रतिमा हा पक्ष सादर करीत आहे. महाराष्ट्रातील त्या पक्षाचा सत्तेतील भागीदार असलेल्या शिवसेनेचे अध्यक्ष श्री बाळासाहेब ठाकरे यांनी याबद्दल तीव्र नाराजी व्यक्त केल्याचे वृत्त प्रसिद्ध झाले आहेच. ते बोलके आहे.

## – ३ –

भारतीय जनता पक्ष स्वतःच्या बळावर राज्यकर्ता बनला तरी आभाळ कोसळले असे मानण्याचे काही कारण नाही. काय वाट्टेल ते करून भाजपच्या हाती सत्ता येऊ द्यावयाची नाही, ही भूमिका घेणारे जे पक्ष आहेत त्यांची, काँग्रेस वगळता, स्वतःची ताकद मर्यादित आहे. खुद्द भाजप, आघाडीमधील वरचढ पक्ष ही भूमिका वठवून केंद्रात सत्तेवर येण्याचेच मर्यादित स्वप्न बाळगीत आहे असे दिसते. आणि म्हणून त्यांनी इतर पक्षांना व समाजघटकांना त्यातल्या त्यात मान्य होणाऱ्या अटलबिहारी वाजपेयी यांना संकल्पित 'पंतप्रधान' म्हणून घोषित केले आहे.

भारतीय जनता पक्षाचे हे स्वप्न साकार होणे भारतीय लोकशाहीच्या पथ्यावरच पडणारे ठरेल. भाजपप्रणीत हिंदुत्ववादी भूमिकेचे आम्ही समर्थक नाही. बाबरी मशीद उद्ध्वस्त करण्याचे राजकारण करण्यासाठी प्रभू रामचंद्रांना वेठीला धरण्याइतक्या खालच्या पायरीवर जे उतरले त्यांचे समर्थन करणे कसे शक्य आहे? या देशातील मुस्लिम राजकारणातील वरचढ प्रवाह हा देशाच्या ऐक्याची पुष्टी करणारा नाही ही, दुर्दैवाने, वस्तुस्थिती आहे. पण मुस्लिम समाजाला यांच्या पकडीमधून सोडविण्याचे राजकारण काही वेगळेच असावे लागेल. मग आम्ही या परिच्छेदाच्या आरंभीचे वाक्य का लिहिले आहे असा प्रश्न उपस्थित केला जाईल. कोणास आवडो न आवडो, भारताच्या राजकारणातील तो एक बऱ्यापैकी प्रबळ शक्तिप्रवाह आहे. स्वतःची ओळख 'हिंदू' म्हणून इतरांना देणारा व इतरही ज्याला हिंदू म्हणून ओळखतात त्या हिंदू समाजाचे अस्तित्व, त्याचे मोठे प्रमाण व त्याचे मध्यवर्ती स्थान दृष्टिआड करता येणार नाही. 'आम्ही कधी हिंदू नव्हतो व आजही नाही' ही भूमिका रुजवून एक सक्रिय राजकारण खेळले जात आहे. हे राजकारण करणारे पक्ष व संघटना-चळवळी जशा व जेवढ्या वैध आहेत तशी व तेवढी हिंदुत्ववादी भाजप ही शक्तीही वैध आहे. असे वैध राजकीय शक्तिप्रवाह जेव्हा काही कारणांनी बाळीत टाकले जातात किंवा त्यांची अस्वाभाविक कोंडी केली जाते त्यावेळी ते जास्तच कट्टर, आक्रमक व हिंस्र बनतात. उलटपक्षी, लोकशाही प्रक्रियेत त्या शक्तिप्रवाहांना एकमेकांचे अस्तित्व, स्थान व बलाबल यांचा स्वीकार करून जुळवून घ्यावे लागते, राज्यही करावे लागते तेव्हा त्यांच्या कट्टर, आक्रमक व हिंस्र स्वभावविशेषांना उतार पडतो. ही प्रक्रिया किती समर्थपणे चालते हे त्या त्या लोकशाहीच्या आंतरिक सामर्थ्याचे एक महत्त्वाचे गमक असते. हे सामर्थ्य भारतीय लोकशाहीने आजवर सातत्याने प्रकट केले आहे. मागील वेळी भाजपने केलेल्या आघाडीच्या हाती केवळ काही दिवस सत्ता राहिली. या वेळी जर त्याने केलेल्या आघाडीला पर्याप्त जागा

मिळाल्या आणि त्याच्या नेतृत्वाखाली सरकार काही काळ बनले तर या देशाचे एकराष्ट्रीयत्व टिकविण्याचे, ते अधिक भक्कम करण्याचे आव्हान त्यालाही झेलावे लागेल. त्यातून तो पक्षही धडे शिकेल. दुसरीकडे, अशा केंद्रीय सरकारच्या अंमलाला सामोरे जाण्यामधून भारतीय लोकशाही परंपरा अधिक सुदृढ बनेल.

जे केंद्रीय शासन कोणी टेकू काढून घेऊन हवे तेव्हा कोसळवू शकत नाही; जे बराच काळ स्थिर राहील, असे 'उजवे' सरकार ही इष्टापत्ती ठरेल. 'उजवे'पणाची व्याख्या वेगवेगळ्या प्रकारे करता येते. सामाजिक, वैचारिक-सांस्कृतिक, राजकीय व आर्थिक अंगांनी. मध्यममार्गी 'उजव्या' भूमिकांचा अखिल भारतीय पक्ष म्हणून भारतीय जनता पक्ष वाढत असेल तर ती काँग्रेसच्या ऱ्हासामधून घडून येत असलेली एक स्वाभाविक गोष्ट म्हणायला हवी. अशा पक्षाचे स्थिर सरकार जर पाच वर्षे सत्तेवर राहिले तर, त्याच्या भूमिकांना, धोरणांना व कार्यक्रमांना विरोध करण्याच्या प्रक्रियेमधून एक समर्थ मध्यममार्गी 'डावा' पक्ष संघटित होण्यासाठी ती चांगली संधी ठरेल. कोणत्याही संसदीय लोकशाहीचा अभ्यास केल्यास असे आढळते की, दोन मध्यममार्गी बलिष्ठ पक्ष अस्तित्वात असणे ही उपकारक स्थिती असते. ज्या समाजात फक्त 'टोकाचे', कडवे, जहाल पक्ष सत्तेसाठी प्रतिस्पर्धी असतात तेथे लोकशाही टिकत नाही. सामान्य जनता मध्यममार्गी असते, पण सत्ताधारी पक्ष तिच्यावर मग स्वतःची पक्षशाही लादतो. भारताचे वैशिष्ट्य हे राहिले की, काँग्रेस हा असा एक मध्यममार्गी पक्ष होता की, त्याच्या विरोधात दुसरा मध्यममार्गी 'उजवा' वा 'डावा' पक्ष संघटित करण्यासाठी योग्य ती स्थितीच पन्नास वर्षांपर्यंत उत्पन्न झाली नाही. मध्यममार्गी 'उजवा' पक्ष म्हणून काँग्रेसचे रूपांतर होऊ शकत नव्हते. जनता पक्ष वा जनता दलाचेही त्या स्वरूपात संघटन होऊ शकत नव्हते. तर, मध्यममार्गीय 'उजवा' पक्ष म्हणून पुढे येणे हे भारतीय जनता पक्षाचे भवितव्यच होते असे म्हणता येईल.* मध्यमवर्गीय 'डावा' पक्ष म्हणून कोणता तरी एक पक्ष पुढे येण्याची प्रक्रिया गतिमान होण्यासाठी केंद्रात भाजपच्या नेतृत्वाखालील सरकार पुरेसा दीर्घ काळ सत्तेवर राहणे उपकारक ठरू शकते.

– ४ –

"मध्यममार्गी 'डावा' पक्ष" ही नेमस्त प्रतिमा आहे. आणि वास्तवातही असा पक्ष फार क्रांतिकारक असणार नाही; तो सुधारणावादीच असेल. जोवर काँग्रेस हाच मध्यममार्गी 'उजवा' व 'डावा', दोन्हीही होता तोवर मामला एक प्रकारे सोपा होता. अल्पसंख्य, जहाल, 'बंडखोर' गट वा पक्ष म्हणून विरोधकाची भूमिका वठविणे पत्करता येत होते. आपण कायम 'विरोधक' राहणार हे स्वीकारण्यातही एक सुरक्षितता, एक निश्चिंतता व एक आत्मगौरवाची भावना असते. आज आता परिस्थितीने समोर ठेवलेली निकड व आव्हान वेगळे आहे. एक मोठा, देशव्यापी, प्रवळ मध्यममार्गी 'डावा' पक्ष बांधण्याचे ते आव्हान आहे.

आघाड्यांचे युग अवतरले आहे, आणि हे भारतीय लोकशाहीचे पुढचे पाऊल आहे, अशा आशयाचे प्रतिपादन कशाचे लक्षण म्हणावे? आपद्धर्मालाच सैद्धान्तिक साज चढविणे म्हणावे, की अदूरदर्शी संधिसाधूपणा म्हणावा, की स्वतःच्या दुबळेपणाची कबुली मानावी? लोकनायक जयप्रकाशांनी १९७७ साली पुढाकार घेऊन जनता पक्ष स्थापन केला. तो प्रयोग असफल ठरणे अटळ होते. पण पुढे जनता दलाची स्थापना झाली, आणि विश्वनाथप्रताप सिंहांच्या नेतृत्वाखाली केंद्रात सत्ताही आली. तो प्रयोगही यशस्वी झाला नाही. केवळ सत्ता हातातून गेली असे नाही; पक्ष म्हणूनही तो उत्तरोत्तर ढासळतच गेला आहे. जनता दलाचे नेते जेव्हा आघाड्यांच्या राजकारणाची भलावण करतात तेव्हा ती त्यांच्या अकर्तृत्वाचीच कबुली म्हणावी लागते.

मध्यममार्गी 'डावा' पक्ष उभारण्यासाठी जास्तीत जास्त अनुकूलता स्वातंत्र्योत्तर काळात लोकशाही समाजवाद्यांना होती. ही ऐतिहासिक संधी त्यांनी गमावली. इतकेच नाही तर, जिची स्वतंत्र ओळख टिकून आहे अशी लोकशाही समाजवादी चळवळ जनता पक्ष व जनता दलाच्या राजकारणाच्या ओघात नष्टप्राय झाली. तिचे पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न ('समाजवादी जन परिषद' या पक्षाच्या रूपाने) अद्यापि तरी क्षीण आहे. सापेक्षतः साम्यवादी पक्ष पुष्कळ धडपणे टिकून आहेत. प. बंगालमध्ये तर डाव्या कम्युनिस्ट पक्षाच्या नेतृत्वाखालील आघाडीच्या हाती दीर्घ काळ सत्ता आहे. इतर पक्ष परिस्थितीतील

---

* मध्यममार्गी 'उजवा' पक्ष बनण्याच्या प्रक्रियेत यशस्वी होण्यासाठी, रा.स्व.संघीय वारशाचा गौरवाने उल्लेख करीत राहून, त्याच वेळी स्वतःचे रा.स्व. संघ, विश्व हिंदू परिषद व यासारख्या टोकाच्या भूमिका बाळगणाऱ्या संघटनांपासूनचे अंतरही स्पष्ट केले जात आहे ही गोष्ट ध्यानात घेण्यासारखी आहे. भाजप 'काँग्रेसी-संस्कृती' आत्मसात करीत असल्याचेही दिसत आहे. हा बदलही अर्थपूर्ण आहे.

बदलापुढे टिकाव धरू शकणार नाहीत, व मग त्या पोकळीत आपण प्रबळतम देशव्यापी पक्ष बनू, अशी साम्यवादी पक्षांच्या नेतृत्वाची भूमिका आहे की काय असे वाटते. जागतिकीकरण आणि अर्थव्यवस्थेवर खाजगी क्षेत्राचे वाढते प्रभुत्व यामुळे अर्थव्यवस्था कोसळेल, वर्गीय ध्रुवीकरण अतिशय तीव्र होईल, आणि परिस्थितीच शोषित-पीडितांच्या बरोबरीने आजच्या मध्यमवर्गीयांना व संघटित क्षेत्रातील कामगारवर्गाला साम्यवादी पक्षांच्या मागे आणील अशीही अटकळ असावी.

एक गोष्ट मात्र खरी. भारतीय समाज जातीजमातींमध्ये विभागलेला आहे. सामाजिक-आर्थिक विषमता, उच्चनीच भाव व दुरावा यांनी ग्रस्त आहे. पारंपरिक जातिव्यवस्थाधिष्ठित समाजात असलेली एकात्मता व उच्चवर्णियांची/वरचढ जमीनदार जातींची पकड, दोन्ही, लोकशाही राजकारणाच्या ओघात आज ढिली पडली आहे. भारतीय समाज आज पुष्कळ जास्त चिरफाळलेल्या, कलहग्रस्त स्थितीत आहे. ही परिस्थिती मध्यमवर्गीय 'उजव्या' पक्षाच्या बांधणीच्या तितकी आड येत नाही जेवढी ती मध्यमवर्गीय 'डाव्या' पक्षाच्या बांधणीच्या आड येते. राजकीय जागृती व संघटन यांच्यासाठी विषमता, शोषण, अन्याय-अत्याचार यांच्यावर भर देऊन, समाजातल्या तळागाळाच्या जातीजमाती, गट, वर्ग यांना संघटित करण्याच्या भूमिकेमुळे शत्रू लेखून समाजातला एक मोठा विभाग – सधन म्हणून, व्यापारी-भांडवलदार-उद्योगपती म्हणून, उच्चवर्णीय म्हणून, आणि आज 'हिंदू' म्हणून – वगळण्यावर भर असल्याने सगळ्या समाजाला बरोबर घेऊन जाणारा पक्ष बांधण्यात अनुल्लंघनीय अडचण उत्पन्न होते. पढिक पुस्तकी पद्धतीने हिशेब केला असता, 'तळागाळा'चे लोक टक्केवारीने इतके जास्त ठरतात की केवळ त्यांना एकत्र केल्यासही सत्ता कायमची 'डाव्यां'च्या हाती राहील, असा निष्कर्ष निघतो. व्यवहारात जातपात, सामाजिक प्रतिष्ठा, स्पृश्यास्पृश्यता, धर्म इत्यादी कारणांवरून सहजासहजी न सांधता येणारे अंतर असते. पण, त्याही पलीकडे, आर्थिक व राजकीय हितसंबंधही परस्परांना एकत्र आणण्याऐवजी प्रतिस्पर्धी व शत्रू बनविणारे ठरतात. सनातनी (ऑर्थोडॉक्स) चाकोरीबद्ध डावी मंडळी याचेही खापर उच्चवर्णीयांच्यावर फोडतात; त्यांना यात कारस्थान दिसते. पण हा सामाजिक वास्तवाचा एक परिणाम आहे. तात्पर्य असे की, तळागाळातल्या वा कनिष्ठ स्तरांवरील विभिन्न जातीजमातींना, समूहांना एका राजकीय पक्षात आणणे ही मुळातच अवघड असलेली गोष्ट, हितसंबंधांनुसार वर्गीय/जातीय संघटन उभारून लढे देण्यावर भर देण्याच्या भूमिकेमुळे अधिकच अवघड बनते.

मार्क्सच्या मांडणीचा खोलवर प्रभाव असलेली, जातपात, स्पृश्यास्पृश्यता, धर्मभेद इत्यादींना नाकारणारी पण वर्गीय/जातीय/धार्मिक/वांशिक-सांस्कृतिक भेद व कलह यांपेक्षा राष्ट्रवाद, लोकशाही, समाजवाद यांवरील निष्ठेच्या भूमिकेमधून सर्वांचे राजकीय संघटन बांधण्यावर भर देणारी लोकशाही समाजवादी चळवळ ही मध्यममार्गी 'डावा' पक्ष उभारण्याच्या दृष्टीने वैचारिकदृष्ट्या सर्वात सक्षम अशी चळवळ होती. भेद, विषमता, शोषण, अन्याय-अत्याचार यांची वास्तविकता खरीच; पण त्याच वेळी प्राचीन इतिहास-परंपरा व संस्कृती असलेला हा एक भारतीय समाज आहे, आपण एका समाजाचे घटक आहोत हे वास्तवही तेवढेच खरे आहे ही धारणा पक्की होती. तसेच, जन्माने माणूस कोणी कोणत्याही जात-जमातीचा-धर्माचा असो, तो विचाराने लोकशाही समाजवादी असला आणि विचारांचा सच्चा असला म्हणजे पुरे; अशा सर्वांची मिळून नवसमाज निर्मितीची एकच चळवळ असू शकते, नव्हे असली पाहिजे, ही भूमिका होती. ज्यांची भूमिका क्रांतिकारक परिवर्तनाची, नवसमाज उभारणीची आहे त्यांनी जात-जमात-धर्मवार राजकीय संघटना उभारू नयेत, कारण ती गोष्ट विसंवादी वा घातक ठरेल हीपण समज होती. अलीकडच्या पंचवीस वर्षांमध्ये 'उच्चवर्णीय हिंदू'च्या विरोधात डाव्या-पुरोगामीपणाची व्याख्या केली जाऊ लागल्यापासून 'डावी' राजकीय चळवळ ही अनेक जात-जमात-धर्म यांनी बंदिस्त असलेल्या अनेक स्तरांमध्ये विभागली गेली आहे. आदिवासी, भटके-विमुक्त, दलित, ओबीसी, मुस्लिम, ख्रिश्चन – जो तो वेगळा झालाय. यात पुन्हा अंतर्गत चिरफळ्या आहेतच. त्यामुळे सर्व जात-जमात-धर्म यांचा एकच एक 'डावा' पक्ष आकारास येणे अशक्यप्राय बनले आहे. कांशीराम यांच्या बहुजन समाज पार्टीचेही संघटन काही समाज घटकांना वगळण्यावर आधारलेले आहे. महाराष्ट्रातील बहुजन महासंघाचीही हीच स्थिती आहे.

केंद्रामध्ये भारतीय जनता पक्षाच्या नेतृत्वाखालील आघाडीचे सरकार पुरेसा दीर्घ काळ सत्तेवर राहणे मध्यममार्गी 'डाव्या' पक्षाच्या बांधणीच्या दृष्टीने उपकारक ठरेल असे का म्हटले याची काही स्पष्टता पुढीलप्रमाणे करता येईल. भारतीय जनता पक्ष हा हिंदुत्ववादी पक्ष असला तरी, ज्यांच्याबरोबर आघाडी

करून तो सत्तेवर येऊ व राहू शकतो ते पक्ष कोणते हे पाहिले तर, त्या पक्षाला रा.स्व.संघ-सावरकरवादी हिंदुराष्ट्रवादाच्या भूमिकेचा त्याग करून लोकमान्य टिळकांच्या, वा त्याही आधीचा दाखला द्यायचा तर शिवाजी महाराजांच्या, भूमिकेचा अंगीकार करावा लागेल. म्हणजे येथील मुस्लिम, ख्रिश्चन व अन्य धर्मीय समाजांना तसेच आदिवासी, निम्नजातीय व दलित या त्यांच्या दृष्टीने हिंदूच असलेल्या समाजघटकांना भेदभाव न करता सन्मानपूर्वक सामावून घेण्याचे धोरण ठेवावे लागेल. लोकशाही राजकीय प्रक्रियेतच हा अंगभूत गुणधर्म आहे की, ती प्रक्रियाच जर उलथून टाकली नाही तर, ती तुम्हाला वास्तवाशी जुळवून घेण्यास भाग पाडते. आता, भारतीय जनता पक्षात ही आंतरिक उत्क्रांती घडून आली तरी तो पक्ष हा 'उजव्या' गुणवैशिष्ट्यांचाच राहील. 'उजवा' = प्रतिगामी, 'ब्राह्मणी', भांडवलदारधर्जिणा, नियोजनबद्ध आर्थिक विकास-विरोधी हे समीकरण यापुढच्या काळात चुकीचे ठरणार आहे. पुनरुज्जीवनवादी नसलेला पण परंपराभिमानी असलेला आधुनिकतावादी, जातपात व स्पृश्यास्पृश्यता न मानणारा पण गुणवत्ता व कर्तृत्व यांनुसार स्तर पडणे स्वाभाविक व इष्ट मानणारा, जे यशस्वी, वरचढ, प्रस्थापित व प्रतिष्ठित आहेत त्यांच्या बाजूने पक्षपाती असणारा, प्रचलित व्यवस्थेला पाठिंबा देण्याची 'जैसेथेवादी' भूमिका घेत असतानाच अनेक मुद्यांवरून समाजात खोलवर रुजलेल्या समजुती, पूर्वग्रह, भावना, श्रद्धा यांना आवाहन करून 'बंडखोर', लोकप्रिय व जनताधिष्ठित राजकारण करणारा पक्ष या अंगाने 'उजवेपण' समजून घेणे महत्त्वाचे आहे. या प्रकारची 'उजवी' स्वभावप्रकृती लोकमान्य टिळकांची होती, सरदार वल्लभभाई पटेलांची होती. 'कॉन्झर्व्हेटिव्ह' हा इंग्रजी शब्द अधिक अन्वर्थक आहे. सुधारणा, बदल यांना या पक्षाचा विरोध नसतो. त्यांना घड्याळाचे काटे उलटे फिरवावयाचे नसतात. आर्थिक बाबतीत आपण असे म्हणू की, हा पक्ष कामगार संघटना, कामगारांचे रास्त हक्क, किमान वेतन, कामाच्या योग्य शर्ती यांचा स्वीकार करतो पण मालक-कामगार, जमीनदार/शेतकरी-शेतमजूर हे भेद राहणे योग्य व इष्ट मानतो. तो मालकांच्या बाजूचा असतो. पांढरपेशा व्यावसायिकांच्या बाजूचा असतो. स्त्रियांच्या बाबतीत, जुने सर्व निर्बंध पुनरुज्जीवित करावेत, स्त्रियांनी घराबाहेर पडू नये, चूल व मूल यातच जीवनाची कृतकृत्यता मानावी असे मानीत नाही. पुरुषांच्या जगात कर्तृत्व गाजविणाऱ्या स्त्रियांचे हा पक्ष कौतुकही करतो. (उदा. इंग्लंडमध्ये मार्गारेट थॅचरवाई किंवा भारतात इंदिरा गांधी.) पण कुटुंबसंस्थेचे मध्यवर्ती स्थान, विवाहबंधनाचे पावित्र्य, स्त्रीने पाळावयाच्या मर्यादा, तिची विशेष कार्ये व कर्तव्ये यांच्यावर भर देतो.

अशा आधुनिकतावादी, सुधारणावादी, लोकशाही मानणाऱ्या 'उजव्या' पक्षाच्या नेतृत्वाखालच्या आघाडीच्या हाती सत्ता आली व टिकली तर, त्या आघाडीच्या हातून सत्ता हस्तगत करण्यासाठी विरोधी आघाडीचे नेतृत्व करू शकेल अशा मोठ्या व प्रबळ मध्यममार्गी 'डाव्या' पक्षाची बांधणी करण्याचे आव्हान झेलावेच लागेल. अन्यथा निष्प्रभ अवस्थेत राहावे लागेल. आपले जुनाट कालबाह्य पूर्वग्रह, बंदिस्त वैचारिक चाकोऱ्या, बदललेल्या वास्तवाचे चुकीचे वाचन, जातीय-जमातीय अस्मितांचा आग्रह, नेतृत्वाची मक्तेदारी राखण्यावरूनची भांडणे व स्पर्धा यांमधून बाहेर पडावे लागेल. 'उजव्या' आघाडीच्या हाती पुरेसा काळ सत्ता राहिल्यास हे घडून येण्यासाठी आवश्यक तो दबाव निर्माण होईल.

काँग्रेस एक पक्ष म्हणून पूर्णपणे नष्ट होईल का? की तो एक अगदी नगण्य असा परिघावरील अल्पसंख्य पक्ष म्हणून राहील? मध्यममार्गी 'उजव्या' पक्ष/आघाडीच्या उत्कर्षाविषयी वर केलेला युक्तिवाद जर यथार्थ असेल तर, एक अंदाज वर्तविता येतो. मध्यममार्गी 'डाव्या' पक्षाची बांधणी काँग्रेसच्या पुनरुत्थानाच्या स्वरूपात घडून येणे शक्यतेच्या कोटीतले आहे. आणि काँग्रेसच्या गाभ्याभोवती अशा पक्षाची बांधणी करण्याचा प्रयत्न यशस्वी ठरण्याचीपण सर्वाधिक शक्यता आहे.

– ५ –

भारतीय लोकशाहीची तुलना अमेरिकेशी करणे अनेक अंगांनी अर्थपूर्ण ठरते. भारत हा खंडप्राय देश आहे, आणि ते एक संघराज्य आहे. येथे वैविध्य, भिन्नत्व पुष्कळ आहे. कालांतराने भारतातही राज्यांची संख्या ५०-६० इतकी होणे स्वाभाविक ठरेल. एकेका भाषक समूहाचाही इतिहास, त्याची परंपरा, ठेवण व वळण वैशिष्ट्यपूर्ण तर आहेच पण एका भाषक समूहाच्या अंतर्गतही अनेक उप-समूह आहेत, ज्यांचे एकमेकांपासून वैशिष्ट्यपूर्ण वेगळेपण आहे. अमेरिकेतील दोन प्रमुख पक्ष घेतले – डेमोक्रॅटिक व रिपब्लिकन – तर वस्तुतः त्या स्थिर स्वरूपाच्या युत्याच आहेत असे आढळून येते. राज्यांच्या पातळीवर प्रादेशिकता, स्वायत्तता बरीच आढळते. एकेक पक्ष कोणत्या

उपगटांचा मिळून बनलेला आहे ते जर पाहू लागलो तर, हे सगळे एकाच राजकीय पक्षात कसे, असा प्रश्न पडण्याइतके भिन्नत्व आढळते, परस्परविरोध आढळतो. पण दोन्ही पक्ष राष्ट्रव्यापी आहेत. दोन्ही मध्यममार्गी आहेत. आणि तरीही, अमेरिकन मानदंडांनुसार, 'डावे' – 'उजवे' असा फरक करता येण्याइतका फरकही आहे.

प्रत्येक पक्ष स्वतः अध्यक्षीय उमेदवार कसा निवडतो, उपाध्यक्षपदासाठी उमेदवार निश्चित कसा होतो या प्रक्रियेचे वरवर निरीक्षण केले तरी, प्रादेशिक पुढारी, राष्ट्रीय समाज-घटकांचे (पांढरपेशे व्यावसायिक, कामगार संघटना, शेतकरी संघटना इत्यादी) नेते यांच्याशी हातमिळवणी करूनच उमेदवाराला प्रथमतः पक्षांतर्गत पाठिंबा मिळवून उमेदवारी हस्तगत करावी लागते. पण रिपब्लिकन वा डेमोक्रॅटिक पक्ष या अस्थिर, हंगामी आघाड्या नाहीत; आवळ्याभोपळ्यांची मोट असे त्यांचे स्वरूप नाही. त्या त्या पक्षात जे गट आहेत त्यांची पक्षाला दीर्घकाळपासूनची निष्ठा आहे. अमूक गट या राज्यात, वा साऱ्या देशात, या पक्षात का, याचे ऐतिहासिकदृष्ट्या उत्तर देता येते. अशा निष्ठावान मतदारांपलीकडे, अर्थातच, त्या त्या वेळी कोणत्या उमेदवारास मत द्यावयाचे ते स्वतंत्रपणे ठरविणारा मतदारांचा समूहही असतोच.

संघराज्यरचनेमध्ये अपेक्षित असणारी प्रादेशिक स्वायत्तता राहूनही राष्ट्रपातळीवर एकात्म, स्थिर व मजबूत सरकार असण्याची गरज असते. १९६७ नंतरच्या काळातला, तीस वर्षांच्या कालावधीतला आघाड्यांचा अनुभव लक्षात घेतल्यास एकंदरीने आघाड्यांच्या सरकारांची कामगिरी, प. बंगालसारखे अपवादात्मक उदाहरण वगळता, समाधान देणारी राहिलेली नाही. प. बंगालमध्ये मार्क्सवादी कम्युनिस्ट पक्ष आघाडीतल्या इतर पक्षांच्या तुलनेत इतका मोठा व प्रबळ आहे की ती जवळपास एकपक्षीय राजवटच म्हणावी.

प्रादेशिक वा क्षेत्रीय, विशिष्ट धार्मिक वा जात-जमातीय समूह यांच्या गरजा, समस्या, भावना, आकांक्षा व मागण्या यांच्याकडे दुर्लक्ष झाले वा घोर उपेक्षा झाली म्हणून स्थानिक, प्रादेशिक राजकीय पक्ष उदयास आले व राज्यपातळीवर सत्तेवर येण्याइतकेही कोठे कोठे प्रबळ ठरले. प्रस्थापित मुख्य राजकीय पक्षांकडून आपले हितसंबंध साधले जात नाहीत या अनुभवापोटी वा जाऊ शकणार नाहीत या सैद्धान्तिक भूमिकेपोटी मुस्लिम लीग, रिपब्लिकन पार्टी, बहुजन समाज पार्टी असे पक्ष बांधले गेले. या सगळ्यांच्या पलीकडे, भारतीय लोकशाहीवर स्वतःचे प्रभुत्व टिकवून ठेवणारा काँग्रेस पक्ष होता ही एक देशाच्या दृष्टीने उपकारक स्थिती होती.

सर्व राष्ट्राचे ठळकपणे प्रतिनिधित्व करणारा, मध्यममार्गी 'डाव्या', 'उजव्या', व अन्य सर्व प्रवाहांना स्वतःमध्येच सामावून घेत असल्याने निर्विवाद प्रभुत्व असूनही लोकशाही प्रक्रिया गतिमान ठेवणारा, मोठी पुण्याई पाठीशी असणारा पक्ष म्हणून असलेले स्थान काँग्रेस पुन्हा प्राप्त करून घेऊ शकणार नाही. पण याच कारणाने मध्यममार्गी 'उजवा' व मध्यममार्गी 'डावा' अशा दोन राष्ट्रीय पक्षांचा उत्कर्ष होणे ही भारतीय लोकशाहीची नितांत गरज आहे.

– ६ –

येता काही काळ हे राष्ट्रीय पक्ष युत्यांचे रूप धारण करतील हे स्पष्ट आहे. पण या युत्या स्थिर स्वरूपाच्या होणे इष्ट व आवश्यक आहे. असे स्थिर स्वरूप धारण करण्याच्या दृष्टीने प्रत्येक युतीत एक पक्ष देशव्यापी, मोठा व मध्यवर्ती असणे गरजेचे आहे. सर्वच पक्ष प्रादेशिक वा जात-जमात-धर्म यांपुरते असले तर त्यांची युती ही तात्कालिक आवळ्या-भोपळ्यांची मोट ठरण्याची शक्यता जास्त.

केंद्रात स्थिरपणे सत्ता हाती यावयाची असेल तर या प्रकारची युती पक्षोपपक्षांबरोबर केली पाहिजे हे ओळखून तशी बांधणी दूरदृष्टी बाळगून भारतीय जनता पक्षाचे नेते करीत आहेत. यामधून काँग्रेस, रिपब्लिकन पार्टी, जनता दल व अशाच इतर पक्षांसमोर आव्हान उपस्थित होईल – नव्हे हे आव्हान आजच उपस्थित झाले आहे.

काँग्रेस हा संपल्यात जमा आहे, उपेक्षेने त्याला मारता येईल या प्रकारची चाल चौदा पक्षांच्या युनायटेड फ्रंटच्या अंगलट आली. भारतीय जनता पक्षाच्या युतीच्या राजकारणाचा यशस्वी प्रतिवाद करण्यासाठी स्थिर स्वरूपाची राष्ट्रव्यापी युती जनता दलाच्या भोवती बांधता येत नाही आणि साम्यवादी पक्ष ती भूमिका वठवू म्हणाला तरी त्याच्याकडे ती भूमिका द्यायला इतर पक्ष तयार होणार नाहीत. आजचे वास्तव असे आहे की, काँग्रेसच्या भोवतीच अशा मध्यममार्गी 'डाव्या' युतीची स्थिर बांधणी होऊ शकते. पण याच वास्तवाचा हाही एक भाग आहे की, (१) काँग्रेसचे नेतृत्व, कर्तबगार, दूरदर्शी, उदार व मुत्सद्दी व्यक्तीच्या हाती आज नाही, आणि (२) अन्य पक्षीय नेतृत्वाच्या

मनात 'काँग्रेसला आपण पर्याय देत आहोत' ही गोष्ट फार खोलवर रुजली आहे. या दोन्ही गोष्टी अशी युती घडून येण्याच्या आड येणार. हा अडसर दूर करण्याची वास्तववादी दृष्टी, धृष्टता व समज प्रकट करून ही भूमिका गळी उतरविण्याइतके नैतिक वजन असणारे नेतृत्व विरोधी पक्षांमध्ये आज तरी आढळत नाही.

मध्यरेषेपासून जवळच पण 'डाव्या' अंगाला असलेल्या पक्ष, संघटना व चळवळी यांच्यासमोरील हे आव्हान या निवडणुकीच्या निकालानंतर अधिकच ठळकपणे समोर उभे ठाकेल. स्वातंत्र्यानंतरच्या पन्नास वर्षांमध्ये घडून आलेल्या मन्वंतराची दखल घ्यावी लागेल. पारंपरिक तटबंद्या फोडून एक सर्वसमावेशक, व्यापक, उदार चळवळ चालविण्याऐवजी तटबंदी पक्की करणारे तुकड्या-तुकड्यांचे राजकारण सोडावे लागेल. आपल्या जात-जमात-धर्मीय समुदायाचे मक्तेदारीने नेतृत्व करण्यात गौरव मानण्याऐवजी सर्व समाजाचे नेतृत्व करण्यासाठी पात्रता कमवावी लागेल. ज्या परिवर्तनकारी व नवसमाजउभारणीच्या चळवळीत सर्वांना सन्मानपूर्वक व समानतेने सहभागी व्हावेसे वाटेल अशा एका राष्ट्रवादी लोकशाही समाजवादाची आज-उद्याच्या आलोकात फेरमांडणी करावी लागेल. हे चौपदरी आव्हान यशस्वीपणे झेलणारा कोणताच राष्ट्रीय पक्ष पुढे येऊ शकला नाही तर मग मध्यममार्गी 'उजव्या' युतीच्या हाती सत्ता जाण्याची व दीर्घकाळ राहण्याची गोष्ट अटळ दिसते.

*वसंत पळशीकर*

✲✲

---

## लेखक-परिचय

❖ **अम्लान दत्त** : अर्थशास्त्राचे व्यासंगी, निवृत्त प्राध्यापक व ज्येष्ठ विचारवंत; भूतपूर्व कुलगुरु, नॉर्थ बेंगाल युनिव्हर्सिटी व विश्वभारती विश्वविद्यालय, शांतिनिकेतन; *द थर्ड मूव्हमेन्ट, द गांधीयन वे, बियाँड सोशलिझम* इ. ग्रंथांचे कर्ते. **पत्ता** : पूर्वपल्ली (उत्तर), शांतिनिकेतन ७३१ २३५, प. बंगाल.

❖ **वेणू पळशीकर** : अर्थशास्त्र विषयाच्या निवृत्त प्राध्यापिका, 'नैसर्गिक शेती'चे प्रणेते मासानोबु फुकुओका यांच्या *वन स्ट्रॉ रेव्होल्युशन* या जगविख्यात ग्रंथाचे मराठी भाषांतर (*एका काडातून क्रांती*); अन्य प्रासंगिक लेखन. **पत्ता** : १५० गंगापुरी, वाई ४१२ ८०३ (जि. सातारा).

❖ **रा.ग. जाधव** : प्रसिद्ध समीक्षक; सेवानिवृत्त प्रभारी विभाग संपादक, मराठी विश्वकोश, वाई; **पत्ता** : ११८०, सदाशिव पेठ, अनपट बिल्डींग, पुणे ४११ ०३०.

# *क्रांतीचा शांतिमय मार्ग*

**अम्लान दत्त**

आज समग्र जगाला सतावणारे प्रमुख प्रश्न शांतिमय क्रांतीद्वारेच सुटू शकतील, असा दावा लेखकाने या पुस्तकात* केला आहे. भारताला केंद्रस्थानी ठेवून या विविध प्रश्नांचे विवेचन प्रस्तुत ग्रंथात करण्यात आले आहे. लेखकाच्या मते भारतामध्ये आपल्याला विश्वरूप दर्शन घडून येते. सर्व प्रमुख जागतिक प्रश्नांची जुळी रूपे (काऊंटर पार्ट्स) आपल्याला येथे आढळून येतात. रूढार्थाने 'आधुनिक' समजल्या जाणाऱ्या पद्धतीने भारताचा आणि जगाचाही प्रश्न सुटू शकणार नाही; पर्यायी संस्कृती आणि पर्यायी समाजरचना यांची गरज आहे याची जाणीव जास्त जास्त लोकांना होऊ लागली आहे.

पुस्तकाच्या पहिल्या भागाचे शीर्षक, 'नवसमाजरचनेच्या दिशेने' असे आहे. या भागात 'संपत्ती विरुद्ध कल्याण', 'बेरोजगारीचे संकट', 'चंगळवादाचे धोके', 'मूलगामी विकेंद्रीकरण', 'आजारलेल्या लोकशाहीबद्दलचे विचार : भारत १९९६', 'एकता आणि विविधता' या प्रमुख प्रश्नांचे विश्लेषण करण्यात आले आहे. दुसऱ्या विभागाचे शीर्षक 'शांतिप्रद क्रांतीसाठी' असे असून त्याच शीर्षकाचा एक लेखही या विभागात आहे. या विभागातील अन्य लेख, 'मानवी स्वभाव आणि सामाजिक पुनर्रचना', 'चांगल्या जीवनाविषयीचे स्वप्न', आणि 'अतीतलक्षी मानवतावाद' असे आहेत. परिशिष्टामध्ये, 'एका नव्या युगासाठीचे अर्थशास्त्र' या मथळ्याचा निबंध समाविष्ट केला आहे.

भौतिक संपत्तीच्या वाढीबरोबर मानवी जीवनाची गुणवत्ता सुधारते का? ते अधिक कल्याणप्रद होते का? संपत्तिनिर्मितीच्या पद्धती मानवी कल्याणाच्या आड येतात. स्मिथने सूक्ष्म श्रमविभागणीमुळे (कॉम्प्लेक्स डिव्हिजन ऑफ लेबर) श्रमिक निर्मितीच्या आनंदाला पारखा होतो असे म्हटले; तर मार्क्सने भांडवलाच्या खाजगी मालकीमुळे श्रमिकाचे स्वतः निर्माण केलेल्या संपत्तीशी परात्मभावी नाते निर्माण होते, असे विचार मांडले.

भांडवलशाही देशांमधील मिश्र अर्थव्यवस्थेमुळे सत्ताधारी पक्ष, नोकरशहा आणि व्यावसायिक वर्ग यांची अपवित्र युती झालेली आढळून येते. विसाव्या शतकाच्या मध्यापासून समाजवादी देशांतही अशा प्रकारच्या युतीमुळे नवा मध्यमवर्ग उदयाला आला. अनेक गर्हणीय स्वरूपाचे विशेषाधिकार उपभोगणारा हा 'नवा मध्यम वर्ग' मार्क्सच्या कसोटीनुसार अनुत्पादक वर्ग ठरतो. समाजाच्या संपत्तीमधील या वर्गाचा हिस्सा ही एक प्रकारची लुबाडणूक किंवा पिळवणूक होय.

सामाजिक स्वास्थ्याला सर्वात जास्त धोका आज युद्धप्रवणता आणि लष्करवाद यामुळे बसतो. स्थानिक पातळीवर सुद्धा, हिंसाचार करणाऱ्या गुंडांच्या टोळ्यांचा धोका अनुभवास येतो. हा सर्व फौजफाटा अनुत्पादक वर्गातच मोडतो. त्यांच्या वाढत्या उत्पन्नामुळे खऱ्या उत्पादकवर्गाची लुबाडणूक होऊन मानवी कल्याणाचा ऱ्हास होतो. जागतिक मंदीच्या काळात महत्त्वपूर्ण योगदान करणाऱ्या केन्सच्या अर्थशास्त्रामध्ये उत्पादन-वाटपातील न्याय आणि रोजगारनिर्मिती या दोन गोष्टींवर भर देण्यात आला होता. वरील दोन्ही प्रश्न आजही तेवढेच महत्त्वाचे आहेत. शिवाय आज या शतकाच्या अखेरीला मानवी कल्याणविषयक एक नवीन जाण निर्माण झाली आहे. एकाच नौकेतून प्रवास करणारे आपण सर्व प्रवासी आहोत. पर्यावरणीय प्रदूषणाचा धोका प्रगत-अप्रगत, श्रीमंत-गरीब, सुशिक्षित-अशिक्षित, पहिले जग-तिसरे जग असा भेदभाव न करता सर्वांना सारखाच ग्रासणारा आहे. या प्रदूषणामुळे पृथ्वीतलावरील सर्व सजीव सृष्टीची जीवननौका बुडाली तर आपण सर्वच रसातळाला जाऊ. सह-अस्तित्वाला पर्याय सर्वनाश हाच आहे. *(संपत्ती विरुद्ध कल्याण)*

श्रीमंत व गरीब दोन्ही देशांना त्यांच्या त्यांच्या हितसंबंधांच्या दृष्टीने वेगवेगळ्या प्रकारचे जागतिकीकरण (ग्लोबलायझेशन) हवे आहे. श्रीमंत देशांना त्यांचे भांडवल जगभर कुठेही पाठवायला खुली मुभा हवी आहे; तर गरीब देशांना आपल्या देशांतील बेरोजगार श्रमिकांसाठी परदेशांत रोजगार उपलब्ध व्हावा

* *फॉर अ क्वाएट रेव्होल्यूशन* – अम्लान दत्त, पॅपिरस प्रकाशन, कलकत्ता, १९९७, रु. १००.००. (ग्रंथ परिचयकार : वेणू पळशीकर)

अनुक्रमणिका








अशी इच्छा आहे. भांडवलाची आंतरराष्ट्रीय गतिक्षमता अनिर्बंध असावी असे श्रीमंत देशांना वाटते; तर श्रमाची आंतरराष्ट्रीय गतिक्षमता अनिर्बंध असावी असे गरीब देशांना वाटते. थोडक्यात, सर्वच देशांना आंशिक जागतिकीकरण हवे आहे. मात्र कोणत्या संसाधनांच्या बाबतीत अनिर्बंध जागतिक गतिक्षमता असावी याबद्दल गरीब व श्रीमंत देशांची मते भिन्न आहेत. एकीकडे, बहुसंख्य इंजिनिअर्स, डॉक्टर्स आणि इतर क्षेत्रातील विद्वान मंडळींच्या परदेशगमनामुळे विकसनशील देशांचे नुकसान होत आहे, तर दुसरीकडे भारभूत झालेली श्रमशक्ती परदेशात स्थलांतरित करणे तेथील प्रतिबंधक कायद्यांमुळे शक्य होत नाही. मनुष्यबळ उत्पादक कार्यात गुंतवता न आल्यामुळे ते विध्वंसक मार्गाकडे वळून गुन्हेगारीत रुतलेला वर्ग तळागाळात (लुम्पेन प्रोलेटारियट) निर्माण होत आहे. विकसनशील देशांना त्यांची आंतरराष्ट्रीय देणी भागवण्यासाठी निर्यातवाढ करावीच लागेल. पण जागतिक स्पर्धेत टिकून राहण्यासाठी हे निर्यात-उद्योगधंदे भांडवलसघन तंत्रविज्ञान वापरत असल्यामुळे, बेरोजगारी हटवण्यात त्यांचा विशेष उपयोग होणार नाही. तेव्हा स्थानिक पातळीवरील बेरोजगारांना काम पुरविण्यासाठी स्थानिक संसाधनांच्या साह्याने स्थानिक गरजा भागविण्याचा प्रयत्न झाला पाहिजे. अतृप्त स्थानिक गरजा आणि वापरात नसलेले स्थानिक श्रम यांची सांगड घातल्यास रिकाम्या हातांना अर्थपूर्ण रोजगार मिळेल. विकसनशील देशांमध्ये एका बाजूला जागतिक अर्थव्यवस्थेत समाविष्ट झालेले क्षेत्र दिसून येईल तर त्याच्याच जोडीला वरील प्रकारचे, स्थानिक पातळीवर 'स्वदेशी' अर्थव्यवस्था असलेले क्षेत्रही टिकून राहील. अशी 'स्वदेशी' अर्थव्यवस्था सरकारवर अवलंबून असण्याऐवजी स्थानिक उपक्रमशीलतेवर अवलंबून असली पाहिजे. आत्मनिर्भर असली पाहिजे.

आज जग खूप जवळ आल्यामुळे जागतिक समाजाच्या निरोगीपणासाठी आणि स्थैर्यासाठी स्थानिक 'स्वदेशी' अर्थव्यवस्थेचे स्थैर्य आवश्यक बनले आहे. परदेशी श्रमांना आपल्या देशात प्रतिबंध करणाऱ्या संपन्न देशांनी स्वदेशी भांडवलाच्या अनिर्बंध निर्यातीलाही आळा घालणे जरुरीचे आहे. अशा भांडवल-निर्यातीने जगाच्या एखाद्या कोपऱ्यातील स्थानिक अर्थव्यवस्था विस्कळित करायची आणि त्यामुळे रोजीरोटीला मुकलेल्यांना आपल्या देशात येण्याचा मज्जाव करायचा हे अन्यायकारक आणि सूज्ञतेचा अभाव दर्शविणारे वर्तन आहे. (*बेरोजगारीचे संकट*)

गेल्या तीस-पस्तीस वर्षांपासून जागतिक आर्थिक अरिष्ट आपल्यासमोर उभे ठाकले आहे. या अरिष्टाच्या मुळाशी वाढता अनुत्पादक संरक्षणखर्च आणि वाढता चंगळवादी उपभोगखर्च यांचे सह-अस्तित्व दिसून येते.

विसाव्या शतकाचा पूर्वार्ध दोन जागतिक महायुद्धे आणि साम्राज्यवादी शक्तींच्या आक्रमक स्थानिक लुडबुडींनी व्यापलेला होता. या शतकाच्या उत्तरार्धात जागतिक युद्धाच्या अभावामुळे वरपांगी शांततामय कालखंड असल्याचा भास होतो पण प्रत्यक्षात दीर्घकालीन शीतयुद्धामुळे तो ग्रासलेला आहे. चालू शतकाच्या पूर्वार्धातील लष्कर व संरक्षणखर्चापेक्षा उत्तरार्धातील तत्सम खर्च कितीतरी पटींनी वाढला आहे, असे जागतिक पातळीवर विचार करता दिसून येते. संरक्षणविषयक संशोधनातून काही तज्ज्ञ सेवा व टिकाऊ उपभोग्यवस्तू निर्माण झाल्या आणि चंगळवादाची भुरळ जनतेवर पडली. भूतकाळामध्ये दिखाऊ उपभोग ही फक्त मूठभर खानदानी वर्गाची मिरासदारी होती. आजचा चंगळवाद ज्या नवीन मध्यमवर्गात फोफावलेला दिसतो तो वर्ग संख्येने खूप मोठा व सतत वाढत जाणारा आहे. प्रगत देशांमध्ये तर एकेकाळी कष्टकरी वर्गामध्ये मोडणारे बरेचसे लोक आता मध्यम वर्गाचा भाग बनले आहेत. एवढेच नव्हे तर, जगभरच्या कनिष्ठ मध्यम वर्गातील लोकांनाही आता चंगळवादाचे आकर्षण वाटू लागले आहे. अनेक समाजशास्त्रज्ञ व अर्थतज्ज्ञ यांच्या मते चंगळवादाची प्रवृत्ती आता सतत वाढत व विस्तारतच जाणार आहे. तिच्यापासून मागे फिरणे आता शक्य नाही. संरक्षणखर्च अनुत्पादक असल्यामुळे बचत वाढवून किंवा उपभोगखर्चात काटछाट करूनच तो भागवावा लागतो; नाहीतर आर्थिक असमतोल निर्माण होतो. अर्थसंकल्पीय तूट, चलनवाढ, परराष्ट्रीय देवघेवीतील प्रतिकूल परिस्थिती यासारख्या अरिष्टांना तोंड द्यावे लागते. पहिल्या महायुद्धाच्या अखेरीस हे अनुभवास आले. पूर्वी राजेशाहीच्या काळीसुद्धा अशाच प्रकारचा अनुभव येत असे. कारण युद्धामुळे संरक्षणखर्च अवाढव्य प्रमाणात वाढत असताना स्वतःच्या चैनबाजीच्या खर्चात काटछाट करण्याचा विवेक राजेलोक दाखवत नसत. त्यामुळे आर्थिक अरिष्ट कोसळून अनेक राज्ये व साम्राज्ये नष्ट पावत, लयात जात. भारतामध्येही आज तशीच चिन्हे दिसत आहेत. भांडवलवादी किंवा समाजवादी, सर्व

अर्थव्यवस्थांना हा नियम सारखाच लागू पडतो. प्रवृत्तीपर इहवाद उपभोगाचे मान सतत वाढवीत नेण्यावर व सामाजिक न्याय या दोन्ही गोष्टींवर भर देतो. पण या दोन गोष्टी एकाच वेळी साध्य होणे शक्य नाही. त्यांचा मेळ बसत नाही. सर्वांना चंगळवादी उपभोग समान प्रमाणात वाट्याला येणे अशक्य कोटीतील गोष्ट आहे. म्हणून सामाजिक न्यायाला प्राधान्य देऊन चंगळवादाला आळा घातला पाहिजे. चंगळवादी उपभोगासाठी उत्पादन संसाधने कधीच पुरेशी पडणार नाहीत; तेव्हा उपभोग नियंत्रित करणे विवेकीपणाचे ठरते.

चंगळवाद, भ्रष्टाचार, मूलतत्त्ववाद व हिंसा या सर्व गोष्टी अन्योन्याश्रयाने वाढताना दिसतात. जागतिक पातळीवर या चतुष्टयीचा एकत्रित विचार केला पाहिजे. चंगळवादाचा सुटा विचार करून चालणार नाही. जीवनात नीरसता, कंटाळवाणेपणा वाढत गेला की त्यातून पलायन म्हणूनसुद्धा चंगळवादाचा स्वीकार केला जातो. मुलांना वाढवताना मातेला, शेती पिकवताना शेतकऱ्याला, तसेच कारागिराला वस्तू उत्पादन करताना खरा सर्जक आनंद मिळतो. असे श्रम खडतर असले तरी स्वयमेव समाधान देणारे, सुख देणारे असतात. एकोणिसाव्या शतकातील औद्योगिक क्रांतीनंतर निर्माण झालेल्या कारखानदारी उत्पादनपद्धतीपासून श्रमिकाला असा निर्मितीचा आनंद मिळत नाही. त्यामुळे श्रम ही वस्तू 'उणे उपयोगमूल्य' (डिस-युटिलिटी) असलेली मानली जाऊ लागली. जीवनातील सर्जनशील आनंदाला पारखा झालेला माणूस श्रमामुळे मिळणारा पैसा चंगळवादी उपभोगावर खर्च करून पर्यायी स्वरूपाचा आनंद मिळविण्याचा प्रयत्न करतो. कारखानदारी उत्पादनाच्या श्रमात तोचतोचपणा, यांत्रिकपणा, कंटाळवाणेपणा असतो. औद्योगिक क्रांतिपूर्वीच्या उत्पादकश्रमात अंतस्थ अर्थपूर्णता, आशयसंपन्नता जाणवत असे. श्रमिकाला ते आशयविहीन, अर्थशून्य, पोकळ वाटत नसत. आधुनिक उत्पादनपद्धतीमध्ये श्रमिकाला आत्मीयता, उत्साह वाटत नाही. 'हे काम मला पैसा मिळवून देते, एवढेच नव्हे तर ते माझ्या आवडीचेही आहे, ते करताना मला आनंद मिळतो,' अशी अनुभूती फार थोड्यांना येते. भान हरपून अखंड काम करण्याची ऊर्मी, प्रेरणा राहत नाही. कामाचे तास मोजले जातात, कारण कामाचा 'त्रास' होतो. त्या त्रासापासून, ताणापासून मुक्तता मिळवण्यासाठी चंगळवादी उपभोगाचा व्यसनाप्रमाणे उपयोग केला जातो. श्रद्धाळू अंतःकरणाने, ऋजुतेने निसर्गाशी साधलेली एकरूपता, एकतानता यांची जागा आज निसर्गावर प्रभुत्व गाजवणाऱ्या वृत्तीने घेतली आहे. सर्वत्र एकच चैतन्यतत्त्व भरून राहिले आहे ही भावना आज गूढवादी, अविश्वसनीय आणि त्याज्य समजली जाते. अशा भ्रामक 'बुद्धिप्रामाण्यवादी वस्तुनिष्ठ' तत्त्वज्ञानामुळेही (स्यूडो-पॉझिटिव्हिस्ट) चंगळवाद फोफावतो आहे. चंगळवादी उपभोगाच्या आपण आहारी जात आहोत. अशा उपभोगाची नशा चढून तृप्ती लाभण्यासाठी दिवसेदिवस वाढत्या प्रमाणात चंगळवादी सेवन करावे लागत आहे. या कृत्रिम उत्तेजकांशिवाय जगणे अशक्य होऊ लागले आहे. चंगळवाद, व्यसनाधीनता, भ्रष्टाचार, हिंसा यांची अधिकाधिक गुंफण होत आहे. चंगळवाद आणि लष्करवाद यामधील दुवाही अतूट आहे. आधुनिक समाजातील उद्ध्वस्त आकांक्षांनी प्रज्वलित केलेल्या हिंसेपासून मुक्त व्हायचे असेल तर भुरळ पाडणाऱ्या बाह्य वस्तूंवरील आपले अवलंबन कमी केले पाहिजे. कारण अशा चंगळवादी वस्तूंपासून अपेक्षित असे खरे सुख अंतिमतः मिळतच नसते. शाश्वत, शांततामय व चिरस्थायी समाजजीवनासाठी पूर्णपणे भिन्न अशा जीवनविषयक तत्त्वज्ञानाचा स्वीकार यामध्ये अभिप्रेत आहे.

चंगळवाद म्हणजे नेमके काय? एकेकाळची चैनीची गोष्ट आज आवश्यक मानली जाते. एका मर्यादेपलीकडे व्याख्येबद्दलचा वितंडवाद निरर्थक ठरतो. कालाचा तो अपव्यय आहे. श्रमिकाची श्रमशक्ती टिकून राहावी म्हणून जो खर्च करावा लागतो तो आवश्यक खर्च होय. मानवी समाजाचा रसरशितपणा, नैतिक गुण आणि उत्पादनक्षमता यामध्ये भर घालणारा सर्व खर्च आवश्यक मानता येईल. व्यक्तीच्या विकासाने तिचे सामाजिक योगदान वाढत असेल तर तो खर्च आवश्यक मानता येईल. या पातळीपर्यंतचा उपभोग चिरंतन विकासाच्या संकल्पनेशी सुसंगत होईल. ही मर्यादा ओलांडणाऱ्या उपभोगाला चंगळवादी उपभोग म्हणता येईल. शारीरिक जोम आणि निर्मितिक्षम ऊर्जा टिकवून ठेवण्याच्या दृष्टीने चंगळवादी उपभोग आवश्यक नसल्याने त्याचे समर्थन करणे योग्य होणार नाही. दूरवरचा विचार करूनही असेच म्हणावे लागेल. चंगळवादी उपभोगामुळे दीर्घकाळामध्ये व्यक्तीच्या क्षमता, जोम कमी होऊन व्यक्ती अधिकाधिक प्रमाणात परोपजीवी बनते. तिची आत्मनिर्भरता कमी होते. सामाजिक अभ्युदयाच्या दृष्टीने चंगळवाद अनिष्ट आहे. एवढेच नव्हे, तर जागतिक संसाधनांच्या भौतिक मर्यादा लक्षात घेता, आजच्या चंगळवादी उपभोगामुळे भावी कालातील

अरिष्टांना आपल्याला सामोरे जावे लागेल, हेही लक्षात घेतले पाहिजे. जमिनीची उपजाऊ शक्ती उपजत व अविनाशी असल्याचा रिकार्डोचा दावा आज खोटा ठरला आहे. अतिलोभापायी अंधळे बनून किंतीतरी सुपीक भूखंड आपण नतद्रष्टपणे रेताड, उजाड बनवलेले आज दिसून येत आहेत. उत्पादनाची अनेक संसाधने पुनर्निमितिक्षम नाहीत. आज त्यांचा अतिवापर करून ती लौकर संपुष्टात आली तर भावी पिढीवर ते अन्यायकारक होईल. पर्यावरणीय प्रदूषणाचा धोकाही सभोवार सर्वत्र दृष्टोत्पत्तीस पडत आहे. मानव आणि मानवेतर सजीवांच्या आरोग्यावर व जीवनावर अमर्यादपणे अपायकारक परिणाम त्यामुळे घडून येत आहेत. भावी परिस्थितीबद्दल (ओझोनला पडणाऱ्या छिद्राबद्दल, प्रदूषणाबद्दल इ.) वैज्ञानिकांचे एकमत नाही. काही आशावादी तर इतर काही निराशावादी दिसून येतात. पण आशावाद चुकीचा ठरला आणि वातावरणाचे तापमान वाढल्यामुळे वा ओझोनचा थर पातळ होऊन त्याला छिद्र पडल्यास एकदा का धोकादायक परिस्थिती निर्माण झाली की मग पश्चात्ताप करून काही उपयोग होणार नाही. तेव्हा उगाच विषाची परीक्षा पाहू नये. चंगळवादी प्रवृत्ती हटवणे अशक्य झाल्यास मानवी संस्कृती नष्ट होणे अटळ आहे.

आधुनिक समाजाचे तात्त्विक आणि तंत्रवैज्ञानिक अधिष्ठान बदलण्याचा हा प्रश्न असल्यामुळे नवे वळण संथपणेच, सावकाशीनेच समाजाच्या अंगवळणी पडणार. पण जीवन वा विनाश यांपैकी एकाची निवड करणारी ही निवड आहे, हे ध्यानात ठेवले पाहिजे. मानवजात व संस्कृती टिकून राहण्यासाठी नितांत आवश्यक असे भौतिक व नैतिक अधिष्ठान आज धोक्यात आले आहे. आपल्याला बदलावे तरी लागेल किंवा नष्ट तरी व्हावे लागेल. (*चंगळवादाचे धोके*)

एकाधिकारी शासकीय उत्पादन-पद्धतीमुळे अर्थव्यवस्थेचे केंद्रीकरण घडून येते. खाजगी उत्पादनपद्धतीमुळे अनेककेंद्री पण कमालीची स्पर्धाप्रधान अर्थव्यवस्था निर्माण होते. अवाढव्य जागतिक बाजारपेठांमध्ये 'बळी तो कानपिळी' प्रवृत्ती दिसून येते. बलाढ्य देश कमकुवत देशांचे शोषण करतात. मूलभूत विकेंद्रीकरणासाठी या बाजारव्यवस्थेबाहेर लहान स्थानिक स्वाश्रयी समाजगटांद्वारे अन्योन्याश्रयी सहकारीवृत्तीने उत्पादन व्हावयास हवे. आधुनिक लष्करवादामुळे केंद्रीकरणाची प्रवृत्ती बळावते. दारुगोळा इ. लष्करी साहित्याचे उत्पादन करण्यासाठी अवाढव्य कारखानदारी लागते. तसले उत्पादन करण्यासाठी शासकीय मक्तेदारी निर्माण होते. त्यातून खास अधिकारसंपन्न उच्चभ्रू वर्गाची निर्मिती होते. चंगळवादी उपभोगाची भुरळ हा वर्ग टाळू शकत नाही. त्यामुळे नवीन पिढीला संयमाचे धडे द्यायचा नैतिक अधिकार त्यांना राहत नाही. विकेंद्रित अर्थव्यवस्थेसाठी शैक्षणिक धोरणात एकसारखेपणावर भर न देता स्थानिक व व्यक्तिगत पातळीवरील परिस्थितीजन्य भिन्नता व गरजांची भिन्नता लक्षात घेऊन सर्वसामान्य समजासाठीचे प्राथमिक शिक्षण त्यांच्या अनुभव-विश्वाशी मिळतेजुळते ठेवले पाहिजे. परिसराच्या प्रादेशिक वैविध्यावर त्यामध्ये भर दिला गेला पाहिजे. शिक्षण आणि आरोग्य या बाबतीत ग्रामीण भाग स्वयंपूर्ण आणि स्वयंसंचालित (सेल्फ-डिरेक्टेड) झाला पाहिजे. मूलगामी विकेंद्रीकरणासाठी हे आवश्यक आहे. बाजाराभिमुख असलेल्या औपचारिक अर्थव्यवस्थेच्या जोडीला स्थानिक स्वयंपूर्णतेवर भर देणारी अनौपचारिक अर्थव्यवस्थाही विकसित झाली पाहिजे. राज्यव्यवस्थेचेही मूलगामी विकेंद्रीकरण अभिप्रेत आहे. स्थानिक स्वराज्य संस्थांना सक्षम बनवताना जातिभेद, लिंगभेद यामुळे निर्माण होणाऱ्या अक्षमतांविरुद्ध संघर्ष करावा लागेल. सत्याग्रही पद्धतीने ग्रामीण समाजात नैतिक आणि सांस्कृतिक बदल घडवून आणले पाहिजेत. नाहीतर ग्रामस्वराज्य छोटेखानी हुकूमशाहीमध्ये अधःपतित होईल. शांतता, जातीय सलोखा, परिसर संरक्षण, महिला हक्क व नागरिकांचे हक्क यासाठीच्या सर्व चळवळी पक्षातीत पातळीवर चालवल्या तर त्या यशस्वी होताना दिसतात. स्थानिक स्वराज्य संस्थांच्या पातळीवरील लोकशाही निष्पक्ष (पार्टीलेस डेमॉक्रसी) असली पाहिजे. सैलसरपणे परस्परांशी जोडलेल्या स्वतंत्र, छोट्या छोट्या स्वयंसेवी समूहांचे जाळे निर्माण केले गेले पाहिजे. जुन्या व्यवस्थांचा विध्वंस करण्यात शक्ती वाया घालवण्याऐवजी अशा प्रकारच्या विकेंद्रित पातळीवरील नवनव्या प्रयोगांच्या रोपवाटिकाच समृद्ध करण्याचा प्रयत्न केल्यास आपोआपच नवसमाजरचनेसाठी योग्य ती दिशा प्राप्त होऊ शकेल. (*मूलगामी विकेंद्रीकरण**)

जगातील आकाराने सर्वात मोठी असलेली भारतीय लोकशाही रुग्ण बनली आहे. आजार लौकर बरा होण्यासारखा नाही. पण परिस्थिती आणखी बिघडू नये आणि आपली राज्यव्यवस्था तंदुरुस्त होण्याच्या मार्गाला लागावी म्हणून

* या लेखाचे संपूर्ण भाषांतर *नवभारत* वर्ष ४९, अंक ३, डिसेंबर १९९५ मध्ये प्रसिद्ध झाले आहे.

काहीतरी केलेच पाहिजे. हे भारताच्या आणि जगाच्या दृष्टीनेही महत्त्वाचे आहे. राजकारणाची नैतिक मूल्यांपासून फारकत झाल्यामुळे लोकशाही रोगट बनली आहे. धर्मवेडेपणाला उत्तेजन, सामूहिकद्वेष इ. च्या आधारावर निवडून येणे हे मते पैशांनी विकत घेण्यापेक्षाही हानिकारक आहे. औपचारिकत: लोकशाहीच्या चौकटीमध्ये राहून जातीजमातींमध्ये यादवी युद्धास प्रोत्साहन दिले जात आहे. लोकशाहीमध्ये मतभिन्नतेला वाव असतो. पण कृत्रिमपणे भेद भडक करणे, सहिष्णुता कमी करणे, सहिष्णुवृत्तीवर गदा आणणे हे लोकशाहीला मारक आहे. पक्ष स्थापन करण्याचे स्वातंत्र्य असावे. पण सरकार बदलण्याची प्रक्रिया सुधारण्याची गरज आहे. त्यासाठी भारतीय संविधानात बदल करणे आवश्यक आहे.

आज बहुमतवाला पक्ष इतक्या काठावर बहुमतात असतो की त्याला स्थिर शासन निर्माण करता येत नाही. सर्व संसद सदस्यांना मिळून आपला नेता आणि मंत्रिमंडळातील सदस्य निवडून देता येतील अशी तरतूद संविधानामध्ये करण्यात यावी. खातेवाटप फक्त पंतप्रधानांनी करावे. सर्व प्रमुख पक्षांना मंत्रिमंडळात प्रतिनिधित्व दिले जावे. (जर त्यांना ते नको असेल तर मंत्रिमंडळाबाहेर राहण्याची परवानगीही त्यांना देण्यात यावी.) पक्षाची बांधिलकी न मानता वेळोवेळी विविध विधेयकांवर स्वतंत्र मतदान निर्वाचित सदस्यांना करता यावे. विधेयक नापास झाले म्हणून मंत्र्यांना राजीनामा द्यावा लागू नये. संसद सदस्यांच्या दोन-तृतीयांश बहुमताने पंतप्रधानांना सुद्धा पदच्युत करता यावे. भारताच्या माजी राष्ट्रपतींनी आणि एका सुप्रसिद्ध भारतीय कायदेपंडितांनीसुद्धा अशा सूचना यापूर्वी केलेल्या आहेत. त्या अर्थी लोकशाहीच्या चौकटीत त्या बसू शकतात. (*एक रुग्ण लोकशाही : भारत १९९६*)

जलद वाहतुकीची साधने आणि जलद दूरभाषच्या सोयींमुळे विश्वग्राम (ग्लोबल व्हिलेज) ची कल्पना साकार होऊ लागली आहे. एका खोल अर्थाने सर्व जगावरच आज एकतेचा शिक्का बसला आहे. शांततेसाठी, प्रदूषण टाळण्यासाठी जागतिक पातळीवर एकत्र येऊनच विचारविनिमय करणे भाग आहे. चौथे महायुद्ध होऊच शकणार नाही; कारण तिसऱ्या महायुद्धातच सर्व जग निश्चितपणे नष्ट पावेल. एकदोन देश नव्हेत, तर सर्व मानवी संस्कृतीच नष्ट होईल. सर्व जग आज इतके एकवटले आहे. धर्म, वंश, जाती-जमाती, संस्कृती यांची विविधता असलेल्या या जगात आज, विशिष्ट मानवी समूहांचे – वर्गांचे, राष्ट्रांचे इ. – स्वार्थ जरी वेगवेगळे असले तरी, भवितव्याच्या वा विधिलिखिताच्या (डेस्टिनी) पातळीवर मानवजातीचाच एक म्हणून विचार करण्याचा टप्पा आपण गाठलेला आहे. आपण सर्व एकाच नौकेतून प्रवास करणारे प्रवासी बनलो आहोत.

व्यवहाराच्या पातळीवर आपण इतक्या अंगांनी परस्परांशी घट्ट बांधले गेलो आहोत की, सारी मानवजात एकच आहे व पृथ्वी हे सर्वांचे समाईक घर आहे असे म्हणणे अर्थपूर्ण आहे. पण अनेकानेक वांशिक-सांस्कृतिकदृष्ट्या भिन्नभिन्न समाजांमध्ये मानवजात आजपण विभागलेली आहे. मानवजातीचे लहानमोठे तुकडे पडण्याला जणूकाही अंतच नाही असे म्हणता येईल अशी स्थिति आहे.

ही विविधता, हे भेद कृत्रिमरीत्या मिटणार नाहीत. उदाहरणार्थ, जगातले सर्व लोक एका धर्माचा स्वीकार करतील, किंवा एका विचारप्रणालीचा अंगीकार करतील, किंवा एका जगड्व्याळ साम्राज्याचे वा संघराज्याचे घटक बनतील ही गोष्ट अशक्य आहे. उलट, आज जो तो समूह स्वयंनिर्णयाचा अधिकार बजावण्याचा आग्रह धरीत असल्याचे दिसून येत आहे. स्वत:च्या जमातीचे वा समूहाचे स्वतंत्र राष्ट्र स्थापन करण्याची आकांक्षा इतकी वाढली आहे की, जगभर फुटिरतावाद बोकाळला आहे. एक विचार असा की, ज्यांना ज्यांना म्हणून स्वत:चे स्वतंत्र राष्ट्र हवे आहे त्यांना ते निर्माण करू द्यावे. याने प्रश्न सुटेल का? नाही, असे याचे उत्तर आहे. जेवढी स्वतंत्र राष्ट्रे तेवढी सैन्ये वाढणार. त्यांना अत्याधुनिक शस्त्रास्त्रांनी सज्ज करण्याचा प्रचंड खर्च राष्ट्रे करणार. तेवढ्या शांतता, स्थैर्य, सामंजस्य व ऐक्य या गोष्टी दूर पळणार. अण्वस्त्रांची कहाणी आपल्याला परिचित आहे. आधी एका अमेरिकेकडे, नंतर सोविएत रशियाकडेही – म्हणजे जगात दोन राष्ट्रांजवळ – अण्वस्त्रे झाली. आणि आता अनेक राष्ट्रांच्या हाती अण्वस्त्रे आहेत. आजच्याच दिशेने आपण वाटचाल करीत राहिलो तर, सशस्त्र आतंकवादी टोळ्यांच्या हातीही लहान अण्वस्त्रे येतील हा धोका आहे.

आपण स्वायत्त असावे, आपली सांस्कृतिक-सामाजिक वैशिष्ट्ये टिकून राहावीत ही आकांक्षा रास्त स्वरूपात पूर्ण तर व्हावी पण त्याच वेळी सामंजस्य व ऐक्य जगात वाढावे, या दोन्ही गोष्टी एकाच वेळी साध्य करण्याचे आव्हान आपल्यापुढे आहे. अनेक गोष्टींमध्ये स्वायत्तता, वैविध्याची जपणूक तर

अनुक्रमणिका

इतर अनेक गोष्टींमध्ये समाईकतेची जोपासना, भेदांचे विलोपन करणारी संघराज्यात्मक रचना यांचा एक समतोल साधणे हा एक मार्ग होऊ शकेल. या प्रकारची सूचना, पाकिस्तानच्या संदर्भात खान अब्दुल गफारखान यांनी केली होती. भारताच्या संदर्भातही भाषिक-सांस्कृतिक समूहांना पुष्कळ अधिक स्वायत्तता देणारी अशी संघराज्यात्मक रचना उपकारक ठरण्याची शक्यता आहे. एका अर्थी जगाची वाटचाल या दिशेने सुरूही झाली आहे. यूरपमध्ये ही प्रक्रिया पुष्कळ पुढे गेली आहे. भविष्यात भारत, पाकिस्तान, बांगलादेश, नेपाळ, आणि श्रीलंकादेखील, एका महासंघराज्यात्मक रचनेत काही गोष्टी संयुक्त वा समाईक असाव्यात असे ठरवतील यासाठी प्रयत्नशील राहिले पाहिजे.

विविधता, वैशिष्ट्यपूर्णता यांची जोपासना फक्त राजकीय अंगानेच करावयाची गोष्ट अर्थातच नाही. आर्थिक, वैचारिक-तात्त्विक, सांस्कृतिक परिमाणेही आहेतच.

व्यवहाराच्या पातळीवर ऐक्य प्रस्थापित होण्यासाठी सर्व विश्वाशी, चराचर सृष्टीशी आपण एकरूप आहोत ही धारणापण रुजायला हवी आहे. मानवमात्राविषयीच नव्हे तर, प्राणिमात्र व वनस्पतीसृष्टी यांच्याविषयी आत्मौपम्यवृत्ती उत्पन्न व्हायला हवी. जगातील सर्वांविषयी मनात प्रेमाची भावना व सेवावृत्ती असली तरी, एकाच वेळी तुम्ही साऱ्या मानवजातीची सेवा करू शकत नाही. तेवढी तुमची पोच असत नाही. सुरुवात शेजाऱ्यांशी प्रेमाने, बंधुभावाने वागण्यापासून, त्यांची सेवा करण्यापासून व्हावी ही उचित गोष्ट होय. पण शेजाऱ्या-पाजाऱ्यांपुरती, तुमच्या जमाती वा भाषक समूहापुरती प्रेमाची भावना वा सेवावृत्ती बंदिस्त होता कामा नये. ती टोळीवृत्ती होईल. प्रेमाची भावना व सेवेची वृत्ती आपल्या निकटच्या, आपली पोच आहे तेथवरच्या वर्तुळापासून सुरू होऊन तिचा परिघ सतत विस्तारत राहिला पाहिजे. तिने सर्व मानवजातीला व त्याही पलीकडे सृष्टीला प्रेम वा सेवा यांच्या परिघात सामावून घेतले पाहिजे. विविधतेत एकता जोपासण्याची, आणि ऐक्यासोबत विविधतेचा आदर करण्याची हीच एक रीत होऊ शकते. (*एकता आणि विविधता*)

'क्रांती', 'क्रांतिकारक परिवर्तन' म्हटले की विध्वंस, रक्तपात, उलथापालथ, केंद्रीय सत्तेवर कब्जा या गोष्टी डोळ्यासमोर येतात. केंद्रीभूत सर्वंकष राज्यसत्तेला उलथून टाकणारी, व सत्ता ताब्यात घेणारी क्रांती ही अशीच असावी लागणार असे मनात पक्के रुजणे स्वाभाविकच आहे. पण क्रांतिकारक परिवर्तन असे प्रचंड उत्पातकारी धक्के न देता, मोठा रक्तपात न घडविता, गाजावाजा न करता, अनेक ठिकाणी एकाच काळात घडणाऱ्या घटनाक्रमांचा परिणाम म्हणून शांतपणे (quietly) घडून येते, याचीही उदाहरणे आहेतच. औद्योगिक क्रांती, हरितक्रांती, इलेक्ट्रॉनिक्स रेव्होल्यूशन ही अशी उदाहरणे आहेत. सशस्त्र उठाव करून, एका दमात प्रस्थापित राज्यसत्ता उलथून सत्ता काबीज करणाऱ्या क्रांतीचा नमुना अनुपकारक ठरला आहे. आधुनिक काळात अशा क्रांत्यांमधून अधिकच सर्वंकष, केंद्रीभूत व दमनकारी राज्यसत्ता व त्यांचा अस्मानीसुलतानी कारभार प्रस्थापित होतो असा अनुभव आहे.

राज्यसत्ता आणि नागरिक समाज यांच्या संबंधांचे योग्य स्वरूप कोणते हा आजचा कळीचा मुद्दा आहे. प्राथमिक पायाभूत गरजांच्या पूर्ततेसाठी केंद्रीभूत शासनयंत्रणेवर अवलंबून राहण्याच्या आपल्या मनोवृत्तीचे रवींद्रनाथ टागोरांनी खंडन केले होते. गांधीजींनाही शासनावरील फाजील अवलंबन पसंत नव्हते. समाजवादी समाजव्यवस्था म्हणजे सर्व गोष्टींचे सरकारीकरण असे समीकरण आपण घालतो. ते चुकीचे आहे. समाजवादात अभिप्रेत असलेली मूल्ये, ध्येये व रचना साकार होण्यासाठी सत्तेचे लोकशाही विकेंद्रीकरण होण्याची गरज आहे. पण केंद्रीभूत सत्तेवरील अवलंबनाची वृत्ती व सवय यामुळे स्वावलंबन व परस्पर सहकार्य यांची लोकांची क्षमता खच्ची झाली आहे हे टागोरांचे निरीक्षण योग्यच आहे. या कारणाने सत्ता हस्तगत करण्याच्या राजकारणाला अतिरेकी महत्त्व प्राप्त झाले आहे.

लोकशक्तीच्या उभारणीच्या व अभिव्यक्तीच्या राजकारणाचे लक्ष्य राज्यसंस्थेच्या सत्तेवर अंकुश ठेवणे, तिने हातपाय पसरून समाजावर सर्वंकष नियंत्रण प्रस्थापित करण्याला पायबंद घालणे हे असले पाहिजे. सर्वंकष सत्ता हाती केंद्रित झालेले शासन समाजाचे अपरिमित वाईट करू शकते. समाजाचे भले करण्याची त्याची कुवत फार मर्यादित असते, याचे भान जेवढे असायला हवे तेवढे नाही. समाजामध्ये कोणतीही सुधारणा चिरस्थायी स्वरूपात व्हावयाची असेल तर तिला लोकांमध्ये असलेल्या व्यापक पाठिंब्याचा आधार असला पाहिजे. समाजात नवा विचार व नवा आचार रुजविण्याचे काम सत्तासंपादनासाठी चाललेल्या राजकारणाबाहेरच, लहानमोठ्या बंडखोर समूहांकरवी होत असते. अशा पाखंडी, बंडखोर, नव्या वाटा चोखाळणाऱ्या



अनुक्रमणिका

व्यक्ती व समूहांना त्यांचे कार्य करण्यास मोकळीक ठेवण्याचे कार्य राज्यसत्तेने केल्यास ती मोठी गोष्ट होय.

राष्ट्राराष्ट्रांमधील वा राष्ट्रांतर्गत समाजघटकांमधील तंटेवखेडे मिटविण्यासाठी मतभेदांचा निरास करण्यासाठी हिंसक कलहांचा, युद्धाच्या मार्गाचा वापर वर्ज्य मानावा यावर भर देणाऱ्या शांति-प्रस्थापनेच्या चळवळीचे ('पीस मूव्हमेंट') आज विशेष महत्त्व आहे. कारण अन्यथा अखिल विश्वाचा विध्वंस घडवून आणण्याची शक्ती आज मानवाला प्राप्त झाली आहे. बुद्धाने अहिंसेची शिकवण दिली त्या काळी भौतिक हिंसा फार मोठ्या प्रमाणावर विध्वंस करू शकत नव्हती. अणुशक्तीचा वापर स्थानिकपातळीवरील गावगुंड व अतिरेकीसुद्धा करू शकतील अशी स्थिती नजीकच्या भविष्यात उत्पन्न होऊ शकेल. अन्यायाविरुद्ध अहिंसक प्रतिकार या गांधीजींच्या धोरणाचा अर्थ अन्यायी कृत्यांचा प्रतिकार करत असतानाच, इतर बाबतीत अन्याय करणाऱ्या माणसांबरोबर प्रेमाने व सहृदयतेने वागावे असा होता.

पृथ्वीवरील जीवसृष्टीचे अस्तित्व व उत्क्रांती शक्य करणाऱ्या पर्यावरणीय व्यवस्थेचे संतुलन आज बिघडले आहे. याचे अलीकडच्या काळात उत्पन्न झालेले भान, आणि त्यामधून संतुलनाची पुनर्प्रस्थापना करण्यासाठी मांडली गेलेली कार्यक्रम-पत्रिका, तिचा पाठपुरावा करणारी चळवळ ही भविष्याच्या संदर्भात फार महत्त्वाची दुसरी चळवळ आहे. आजचे औद्योगिकी-करण व आधुनिक जीवनव्यवस्था ज्या 'उच्च तंत्रज्ञाना'वर आधारित आहे ते उच्च तंत्रज्ञान मोठ्या प्रमाणावर पर्यावरण प्रदूषित करणारे आहे. म्हणून विज्ञानाने, म्हणजेच मानवजातीच्या 'सुसंघटित बुद्धी'ने ('ऑर्गनाइज्ड रीझन'), पर्यावरणीय व्यवस्थेशी 'मित्रत्वाचे नाते' प्रस्थापित करणाऱ्या पर्यायी तंत्र-विज्ञानाचा विकास करून त्याचा वापर केला पाहिजे. पर्यायी तंत्रविज्ञानाचा अंगीकार करणे म्हणजे समाजव्यवस्थेची मूलगामी पुनर्रचना करणे होय. ही गोष्ट चटपट साध्य होणारी नाही.

पण चांगली गोष्ट अशी की, या पुनर्रचनेसाठी प्रथमतः (राज्य) सत्ता हस्तगत होण्याची वा प्रथमतः प्रस्थापित व्यवस्था उलथून टाकण्याची आवश्यकता नाही. तसेच, एक परिपूर्ण प्रारूप डोळ्यासमोर हवे याचीही गरज नाही. त्या दिशेने पावले टाकण्यास, प्रयोग करण्यास, चिकाटी व जिद्द न सोडता अडथळे पार करीत राहण्यास महत्त्व आहे. रचनात्मक कार्य व सत्याग्रही संघर्ष यांचा संयोग करणे महत्त्वाचे आहे.

क्रांतीच्या संकल्पनेतही आज अंतर पडले आहे. केंद्रीय सत्ता हस्तगत करणे, विरोधकांचे निर्दालन करणारी 'संक्रमण-कालीन हुकूमशाही' काही काळ प्रस्थापित करणे, आणि सत्तेच्या वापरामधून नवा समाज उभारणे या गोष्टी पूर्वी क्रांतीच्या संकल्पनेशी निगडित होत्या. क्रांतिकारक परिवर्तन ही प्रचलित समाजव्यवस्थेला आतून बदलत जाणारी एक नित्याची प्रक्रिया असते; सत्तेचे सर्वंकष संघटन व वापर याद्वारा नाहीतर स्थानिक, विकेंद्रित पातळीवरील रचना व संघर्ष यांमधून क्रांतिकारक परिवर्तन घडून येत राहते; वैचारिक, सांस्कृतिक व तंत्रवैज्ञानिक बदल यांची महत्त्वपूर्ण भूमिका असते, ही आजची धारणा आहे. विरोधी मतप्रवाह, संघटना व चळवळी यांचे सहअस्तित्व मान्य करून, त्यांच्याबरोबरील द्वंद्वात्मक-संवादात्मक नात्यावर भर आज दिला जातो. आजच्या विचारात साधनशुचितेवर भर आहे. (*फॉर ए क्वाएट रेव्होल्युशन*)

तंत्रवैज्ञानिक प्रगतीच्या जोडीला जर मानवी स्वभावामध्येही सुधारणा झाली असती, नैतिक आणि अध्यात्मिक जाणिवेचा विकास झाला असता तर प्रश्न निर्माण झाले नसते. परंतु तंत्रवैज्ञानिक क्रांतीने मानवी स्वभावप्रकृती उन्नत होत गेलेली नाही असे प्रत्ययास येते.

मनुष्यस्वभाव-प्रकृतीविषयी दोन मतप्रवाह आढळतात. एकानुसार, नैसर्गिक स्वभावप्रकृतीनुसार मनुष्य सत्प्रवृत्तच आहे; समाजव्यवस्थेमधील त्रुटींमुळे वा भ्रष्टतेमुळे माणसे दुष्प्रवृत्त, भ्रष्ट होतात. उदाहरणार्थ, एकेकाळी, भांडवलशाही व्यवस्थेत माणसे राहत असल्याने ती स्वभावप्रकृतीने स्वार्थी, परिग्रही-वृत्तीची, लोभी, दुसऱ्यांची फसवणूक, लुबाडणूक व शोषण करणारी बनलेली आहेत; तर, समाजवादी व्यवस्था जर प्रस्थापित केली तर माणसातील सर्व सत्प्रवृत्ती विकास पावतील आणि उन्नत असा मानव उत्क्रांत होईल असे मानले जात असे. हा समज खोटा असल्याचे इतिहासाने दाखवून दिले आहे. पण, याचा अर्थ समाजाचे संघटन कोणत्या संस्थांकरवी केले जाते याला महत्त्वच नाही असे नाही. उन्नत स्वभावप्रकृतीचा माणूस अमूक एका सामाजिक संस्थात्मक रचनेमधून एका नियमाला अनुसरून निर्माण होतो असे नाही एवढाच अर्थ.

माणसाच्या स्वभावप्रकृतीमध्ये काही अंगभूत अशा अनिष्ट वृत्ती, कल, वासना-विकार आढळतात – उदाहरणार्थ, स्वार्थीपणा, लोभ, हिंसक वृत्ती – असे असले तर, कोणत्या संस्थात्मक रचनेमध्ये अनिष्ट वृत्ती, कल, वासना यांच्यावर

अनुक्रमणिका

अंकुश राहील, त्या जोर करणार नाहीत; उलटपक्षी, हितकारक वृत्ती, कल, वासना यांना प्रोत्साहन मिळेल, याचा विचार जरूरच केला पाहिजे. सत्तेचे केंद्रीकरण वाढविणारी रचना दमन आणि हिंसा यांची सार्वत्रिकता, मात्रा व तीव्रता वाढविते. विकेंद्रित व्यवस्थेत दमन व हिंसा या गोष्टी असतात. पण त्या स्थानिक पातळीवर रोखण्याची, आणि त्यांची मात्रा कमी व सौम्य राखण्याची अनुकूलता वाढते.

मानवजातीच्या आजवरच्या वाटचालीकडे वेगवेगळ्या दृष्टिकोनांमधून बघता येते. 'मानवमात्र तितुका मेळवावा' हे सूत्र पकडून, उत्तरोत्तर, मानवसमूहांमध्ये एकता प्रस्थापित करण्याच्या व परस्पर व्यवहारातील वैर, हिंसा निर्मूल करून परस्परांविषयी बंधुभाव, समत्व बुद्धी व न्याय या तत्त्वांवर मानवजातीचे संघटन करण्याच्या दिशेने चढउतार, आडवळणे, भरकटणे अनुभवीत पण अखेरीस पाऊल पुढे पडून वाटचाल चालली आहे, या दृष्टीने आजवरच्या इतिहासाकडे पाहता येईल व असे पाहणे अर्थपूर्णही म्हणता येईल.

माणसाला ज्ञान सद्‌गुणसंपन्न बनविते ही एक धारणा, तर ज्ञान माणसाला शक्तिमान बनविते ही दुसरी धारणा. ज्ञानाविषयी या दोन्ही धारणा खऱ्याच आहेत. वैज्ञानिक ज्ञान व त्याचे तंत्रवैज्ञानिक उपयोजन यांनी माणसाला सर्वशक्तिमान बनविले आहे ही आपल्या परिचयाची गोष्ट आहे. पण शक्ती/सत्ता माणसाला उन्मत्त, घमेंडखोर व भ्रष्ट बनवते ही गोष्टही आपल्या परिचयाची आहे. प्राप्त झालेल्या शक्तीचा उपयोग सर्व मानवजातीचे जीवन सुखी, समाधानी व शांतिमय होण्यासाठी व्हावा असे ध्येय असेल तर ज्या ज्ञानाने माणसे सद्‌गुणी, शहाणी बनतात असे ज्ञानही संपादन करण्याची आवश्यकता आहे.

सर्व प्रकारच्या गोचर भेदांच्या पलीकडे चराचर सृष्टीशी, आणि खासकरून मानवमात्राशी, आपले नाते सहोदरत्वाचे, एकतेचे आहे हे ज्ञान माणसाला सद्‌गुणसंपन्न, शहाणे, उन्नत बनविते. जीवनधारणेसाठी उपकारक उत्पादक श्रमांमध्ये इतरांबरोबर सहभागी होणे, इतरांची – यात माणसे आली तसे पशुपक्षी, वृक्षवल्ली पण आल्या – प्रेममय सेवा करणे यांच्या द्वारे मानवमात्राशी एकरूपता साधणे हा यासाठीचा एक मार्ग आहे. सर्वसामान्य माणूस स्वतःचा स्वार्थ पाहणाराच असतो, त्याच्याकडून निःस्वार्थी प्रेम व सेवा यांची अपेक्षा ठेवणे केवळ कविकल्पना आहे, अशी प्रतिक्रिया व्यक्त केली जाते. पण ही गोष्ट खरी नाही. स्वार्थ साधण्याच्या प्रवृत्तीसोबतच, उच्चतर ध्येयासाठी स्वतःचे विसर्जन करण्याची प्रेरणा अगदी सामान्य गणल्या जाणाऱ्या माणसातही असते. आणि ही प्रेरणा तेवढीच नैसर्गिक असते. स्वार्थी प्रेरणेचा लोप व या उच्चतर प्रेरणेचा विकास होणे आवश्यक आहे. यासाठी शिक्षणातील वदल आवश्यक ठरतो. असंग्रही वृत्ती, स्वामित्व विसर्जन, सहानुभूतीच्या कक्षा वाढवणे आणि त्याद्वारे सामाजिक पुनर्रचनेच्या समग्र कार्यक्रमाचा आशय साकार करणे, हे चित्र कदाचित फारच आदर्श व अव्यवहार्य वाटेल पण मग असे झाले नाही तर मानवी संस्कृतीचा विनाश अटळ आहे. (*मानवी स्वभावप्रकृती आणि समाजाची पुनर्रचना*)

आदर्शवाद्यांचे दोन प्रकार असतात. आदर्श मानवी जीवनाचे चित्र रेखाटणारे साहित्यिक हा एक प्रकार झाला. आदर्श मानवी जीवन प्रत्यक्षात आचरणात आणणारे कृतिशील विचारवंत हा दुसरा प्रकार होय. प्लेटो, थॉमस मूर या साहित्यिकांचा पहिल्या वर्गात समावेश होतो. महात्मा गांधींची गणना दुसऱ्या वर्गात करता येईल. रवींद्रनाथ ठाकूर आदर्शाचे स्वप्न पाहणारे स्वप्नदर्शी साहित्यिक असले तरी त्याच वेळी शांतिनिकेतन आणि श्रीनिकेतन या संस्थांच्या माध्यमांतून हे आदर्श जीवन व्यवहारात आणण्याचाही प्रयत्न त्यांनी केला.

लिओनार्ड एमहर्स्ट श्रीनिकेतनच्या उभारणीत रवींद्रनाथांसोबत होते. पुढे त्यांनी इंग्लंडमध्ये डार्टिंग्टन हॉल या नावाची आगळीवेगळी शाळा, पत्नी डोरोथी यांच्या सह चालविली. या प्रयोगाच्या संदर्भात डोरोथी एमहर्स्ट यांनी असे म्हटले की, 'आदर्श जीवनाविषयीच्या आमच्या स्वप्नाचा भरवसा दुसऱ्याला मदत करण्यास तत्पर असणारी उपकारबुद्धी व मैत्रीभावना यांच्यावर होता. या दोन गोष्टींच्या आधारावर माणसांच्या समुदायाची (कम्युनिटी) बांधणी होत असते.'

दुसऱ्यांना मदत करण्यात आनंद अनुभवणारी वृत्ती, परस्परांना आधार देणारा शेजारधर्म, सहभागी होऊन कामे पार पाडण्याच्या रीती या गोष्टी ग्रामीण जीवनातून माणसांनी आत्मसात केलेल्या आहेत. कुटुंब, गोतावळा, आळी वा वस्तीमधला समाज यांच्या चौकटीत एकत्र समुदाय करून राहण्यासाठी आवश्यक ती मूल्ये आकाराला आली आहेत. शहर हे नेहमी व्यापारउदीम, सत्ता, लौकिक महत्त्वाकांक्षा यांचे केंद्र राहिले आहे. मानवी संस्कृती व सभ्यता यांत शहरांचे योगदान मोठे आहे हे खरेच. पण पूर्णपणाने शहरी



अनुक्रमणिका

वनणाऱ्या समाज व संस्कृती यांच्या मर्यादापण आज चांगल्याच उघड झाल्या आहेत. कल्पनेतही, एक विशाल कुटुंब हा शहराचा आकार मानता येत नाही. शहर हे सुट्या सुट्या, स्वयंकेंद्री, परस्परांशी स्पर्धा करणाऱ्या, पण परस्परांशी गुंफण असलेली उद्दिष्टे, ध्येये बाळगणाऱ्या व्यक्तींनीच बनलेले असते. या उलट एक संकुचितपणा, 'अरुंद क्षितिजां'नी बनलेले मन व जग ही खेड्यांची मोठी मर्यादा असली तरी, एका विशाल कुटुंबाची त्याची वीण असते; माणसे एकमेकांना साक्षात ओळखणारी असतात. 'चांगला समाज', सुसंस्कृत मानवी समाज निर्माण करण्याचे उद्दिष्ट साध्य करण्यासाठी मूल्यसंस्कार मुलांच्या मनावर करावयाचे मनात असेल तर ग्रामीण परिसरात शाळा असावी याचे विशेष महत्त्व आहे. ही गोष्ट गांधी, रवींद्रनाथ व एमहर्स्ट दांपत्य यांनी जाणली होती.

शहर ही सर्वस्वी मानवी रचना आहे; ती निसर्गाला बाहेर हद्दपार करणारी रचना आहे. माणसाच्या महत्त्वाकांक्षी कर्तृत्वाचा वरचष्मा शहरात पदोपदी प्रत्ययाला येतो. त्याने निर्मिलेली उद्याने, निसर्गरम्य स्थळे येथेही हा वरचष्मा आढळतो. शहरे ज्या जातकुळीचा 'मानवतावाद' (*ह्यूमॅनिझम*) जोपासतात तो अतिरिक्त प्रमाणात मानवकेंद्री व एकांगी असण्याकडे कल असतो. यामुळे या मानवतावादामधून मानवी व्यक्तित्वाची सर्वांगांनी वाढ होत नाही; ते खुरटते, एकांगी बनते. अनाघ्रात स्वरूपातील निसर्गसृष्टीचे सान्निध्य माणसाच्या समग्र, परिपूर्ण विकासासाठी आवश्यक आहे, ही टागोरांची दृष्टी होती.

दैनंदिन जीवन तसेच शिक्षण यांच्यापासून कलेची फारकत होता कामा नये हीपण टागोर व एमहर्स्ट यांची भूमिका होती. कला याचा अर्थ, माणसाच्या ठायी जी प्रतिभा, कल्पकता ही शक्ती आहे आणि माणसाला सौंदर्याची जी आस असते तिची जीवनातली अभिव्यक्ती. ऐंद्रिय संवेदनांकरवी व 'सहानुभावा'-करवी माणूस जग जाणतो, जगाशी अनुबंध जोडतो आणि नवनिर्मितीही करतो. यांना योग्य वळण देणे, सुसंस्कृत करणे, सक्षम बनविणे हे चांगल्या शिक्षणाचे एक मूलभूत काम आहे. यांच्या सुशिक्षणाद्वारेच माणूस माणुसकीसंपन्न सहृदय व्यक्ती बनतो.

चांगल्या जीवनासाठीचे स्वप्न साकार करायचे असेल तर त्यासाठी अगदी प्राथमिक पातळीपासून शिक्षणसंस्थांमध्ये परिवर्तन घडवून आणले पाहिजे. शिक्षण सरकारावलंबी नको असेल तर ते स्वाश्रयी झाले पाहिजे. त्यासाठी विद्यार्थ्यांनी उत्पादक श्रम केले पाहिजेत. पठडीबाज सरकारी शिक्षणात मानवी कल्पनाशक्ती आणि सौंदर्यदृष्टी यांच्या विकासाकडे लक्ष दिले जात नाही. धार्मिकता आणि कलात्मकता यांची सांगड घातली नाही तर कला थिल्लर बनते. म्हणून धार्मिकतेचे अवडंबर नको पण अंतर्मुख बनवणारी आध्यात्मिकतेची जाण निर्माण झाली पाहिजे. रवींद्रनाथ ठाकूरांच्या शांतिनिकेतन आणि श्रीनिकेतन येथील ग्रामीण परिसरातील शाळांमधून श्रमनिष्ठ तसेच कलासक्त अशा आदर्श जीवनाचा वस्तुपाठ विद्यार्थ्यांना मिळत असे.

आदर्श शिक्षणाचे प्रयोग हे धनिकांच्या उदार आश्रयाच्या भरवशावर दीर्घकाळ चालू शकत नाहीत. एक तर मग त्यांना सरकारी अनुदानाचा आश्रय घ्यावा लागतो किंवा त्यांना स्वावलंबी बनायला लागते. सरकारी अनुदानासोबत सरकारी नियंत्रण येते. आणि सरकारी नियंत्रण म्हणजे अटळ असा नोकरशाही वृत्तीचा हस्तक्षेप आणि शिक्षणाला एका प्रमाणित साच्यात बंदिस्त करणे! नवनवे प्रयोग करण्यास विरोध. तेव्हा, आदर्श शिक्षणाचा प्रयोग करणाऱ्यांना स्वावलंबनाखेरीज वास्तविक अन्य पर्याय नाही. पण या भूमिकेचा अंगीकार सोपा नाही. उत्पादक श्रमनिष्ठ व जास्तीत जास्त साधे जीवन ही पथ्ये गांधीजींनी सांगितली होती.

ज्यांना 'चांगले जीवन' हवे आहे आणि एक माणुसकीसंपन्न, सहृदय संस्कृती व समाजव्यवस्था यांची पायाभरणी शिक्षणाद्वारे करावयाची आहे त्यांच्या दृष्टीने, ज्यांची उत्तरे त्यांना शोधायलाच हवीत इतक्या तातडीच्या महत्त्वाचे हे प्रश्न आहेत. (*चांगल्या जीवनाचे स्वप्न*)

मनुष्यस्वभाव आणि मानवी समाज या दोहोंच्या बाबतीत परस्परविरोधी वृत्ती-प्रवृत्ती, त्यांच्यातील संघर्ष व त्या संघर्षाच्या पलीकडे पोचणारा त्या वृत्ती-प्रवृत्तींचा संयोग घडवून आणण्याच्या दिशेने वाटचाल हा समान विशेष आढळतो.

शोषणाचे मूळ अर्थोत्पादनाच्या साधनांवरील खाजगी मालमत्ता या सामाजिक संस्थेत/रचनेत आहे. हे म्हणणे तसे समजावयाला सोपे व मान्य होण्यासारखे आहे. पण काही मूठभर लोकांच्या हाती अर्थोत्पादनाच्या साधनांवरील मालकी एकवटली कशी? इतिहासात काय घडले?

शिकार करून, रानावनात कंदमुळे-फळे गोळा करून उदरनिर्वाह करण्यापलीकडची अवस्था गाठली गेल्यानंतर, म्हणजे माणूस उत्पादक बनल्यानंतर, आपणांस हव्या असलेल्या

अनुक्रमणिका

गोष्टी प्राप्त करून घेण्याचे दोन मार्ग टोळ्यांच्या हाती होते. आपणांस हवे त्याचे पुरेशा प्रमाणात स्वतः उत्पादन करावे किंवा दुसऱ्या उत्पादक टोळ्यांची लूटमार करून त्यांनी कष्टाने केलेले उत्पादन हस्तगत करावे, हे दोन मार्ग. या दोन्ही मार्गांचा अवलंब मानवी टोळ्यांनी, समाजांनी प्राचीन काळापासून केलेला आहे.

दुसऱ्या टोळ्यांवर/समाजांवर आक्रमण करून, पुष्कळ विध्वंस करून, संपत्ती लुटून आणणे हा तसा अकार्यक्षम उपाय आहे; दूरदृष्ट्या तो आतबट्ट्याचा आहे, हे लक्षात आले असणार. कारण उत्पादनाची व्यवस्था उद्ध्वस्त होत असे, अर्थोत्पादनाची साधने ही ऱ्हास पावत वा नष्ट होत. त्यामुळे पहिल्या वेळी जेवढी लूट पदरात पडे तेवढी नंतर पडेनाशी होई. तेव्हा दुसऱ्या टोळीवर विजय प्राप्त करून तो प्रदेश व ती टोळी अंकित करणे, राज्यकर्ते बनून त्यांच्या श्रमाच्या बळावर उत्पादनाची नीट व्यवस्था लावणे, व खंडणी/कर इत्यादी मार्गांनी संपत्तीवर अधिकार प्रस्थापित करणे हे फलदायी होते. राज्ये व मोठे समाज प्रथमतः या प्रकारे अस्तित्वात आले असले पाहिजेत.

व्यापाराची गोष्ट वेगळी असते. व्यापारी देवघेवीमध्ये, असमान प्रमाणात जरी झाला तरी, दोन्ही पक्षांना लाभ मिळत असतो. व्यापारी घडामोडींनी बाजारपेठांचा विस्तार झाला, उत्पादनतंत्रे व पद्धती यांच्यात सतत क्रांतिकारक परिवर्तन होत आले. व्यापाराच्या विस्तारामुळेच एका टप्प्यावर 'औद्योगिक क्रांती' शक्य झाली. आज वैज्ञानिक शोधांमुळे अवकाशातील व कालातील अंतर कमी करता येऊन जग जवळ आले आहे. पण वाढत्या विषमतेमुळे एकात्मतेऐवजी दुरावा वाढत आहे. आपलेपणाऐवजी तुटलेपण वाढत आहे. काही थोड्या मूठभर राष्ट्रांच्या हाती धन व सत्ता यांचे केंद्रीकरण झाले आहे. तिसऱ्या जगातील देशांत, देशांतर्गत असेच धन व सत्ता यांचे विषम केंद्रीकरण आढळते.

मानवजातीमध्ये, म्हणजे वेगवेगळ्या देशांमध्ये, देशांमधील विभिन्न समाजघटकांमध्ये ऐक्य, सहकार्य व सहानुभाव प्रस्थापित करण्याचे ध्येय व्यवहारात मूर्त कसे करता येईल? आजच्या अन्याय्य विषम वाटणीला विरोध करीत असतानाच सौहार्द व सहकार्य यावर आधारित नवे जग कसे निर्माण करता येईल?

रवींद्रनाथ व गांधींजी यांच्यामध्ये १९२१ सालीच आरंभ झालेल्या त्या सुप्रसिद्ध वादसंवादाची आठवण होते. गांधीजींच्या असहकार चळवळीमुळे मानवी एकतेला बाधा येईल अशी शंका १९२१ मध्ये रवींद्रनाथांनी प्रकट केली होती. परंतु शोषण आणि पिळवणुकीच्या कृत्यांविरुद्ध असहकार पुकारल्यामुळे मानवमात्राची सेवा करण्याच्या भावनेला पुष्टीच मिळते, त्यात व्यत्यय येत नाही हे गांधीजींनी स्पष्ट केले. गांधीजी व रवींद्रनाथ यांचे विचार परस्परपूरक होते. परस्परविरोधी नव्हते. आपल्या मातीत आपली मुळे घट्ट रुजलेली असणे, आपल्या संस्कृतीत आपण भक्कम पायावर उभे असणे, आणि त्याच वेळी आपले केंद्रस्थान न सोडता अधिकाधिक विशाल वर्तुळामध्ये सामावून जाणे म्हणजे अतीत-लक्षी मानवतावाद होय. आधुनिक तंत्रविद्येने राज्यसंस्थेचे अतिकेंद्रित स्वरूप शक्य केले आहे. नागरिक शासनावलंबी झाला आहे. समाजवाद म्हणजे सरकारीकरण असा अर्थ लावला जात आहे. गांधीजींचे रचनात्मक कार्य, सर्वोदयाचे कार्य, रवींद्रनाथांनी श्रीनिकेतनमध्ये सुरू केलेले पुनर्रचनात्मक कार्यक्रम या सर्वांचे उद्दिष्ट विकेंद्रित स्वरूपाची, खालपासूनची सुधारणा करणे असे होते. सर्वत्र एकछाप, एकसुरी एकता निर्माण करण्यात मानवी प्रतिष्ठा आपण गमावून बसतो. स्थानिक उन्मेषाला, विविधतेला वाव देऊन अनेकतेमध्ये सुसंवाद साधणारी एकता आपल्याला हवी आहे. तंत्रविद्येच्या सुधारणेमुळे प्रगत औद्योगिक देश लष्करीदृष्ट्या प्रबळ बनले. नैतिकदृष्ट्या मात्र त्यांची घसरणच झालेली दिसते. पूर्वीच्या काळी घोड्यावर स्वार होऊन लूट करणारा टोळीवाला समाज आता आधुनिक उच्च तंत्रविद्येने निर्माण केलेल्या नवनवीन लष्करी शस्त्रास्त्रांनी सज्ज होऊन अधिकाधिक आक्रमक बनला आहे. त्याची नैतिक पातळी खालावतच चालली आहे. याच्याच जोडीला मानवाचे सुसंघटित शोषण व पिळणूक नवीन तंत्रविद्येने शक्य केल्यामुळे मानवी संस्कृतीचे भवितव्य धोक्यात आले आहे.

उच्च तंत्रविद्येच्या विध्वंसक क्षमतेमुळे मानवी एकतेला एक नवा भौतिक पाया लाभला आहे. अण्वस्त्रांच्या व प्रदूषणाच्या धोक्यामुळे मानवजातीचे सहअस्तित्व किंवा सहविनाश अटळ ठरत आहे. भीतीमुळे निर्माण होणारी ही एकता ऋणात्मक स्वरूपाची, नास्तिवाचक आहे. स्थायी एकतेसाठी अस्तिवाचक पायाची गरज आहे. द्वेष, भीती, लोभ या भावना मानवी अस्तित्वासाठी आवश्यक असल्या तरी मर्यादेबाहेर गेल्यास त्या अनिष्टच ठरतात. कल्पकता, प्रेम, सहानुभूती यामुळे मानवी जीवन केवळ भौतिकदृष्ट्याच नव्हे तर अध्यात्मिक व अधिभौतिक दृष्ट्याही संपन्न बनते. स्वामित्वभावनेच्या

विसर्जनामुळे अतीतलक्षी मानवतेचे उद्दिष्ट साध्य होईल. (*अतीतलक्षी मानवतावाद**)

प्रा. ए.के. दासगुप्त या प्रख्यात अर्थशास्त्रज्ञांच्या स्मरणार्थ विश्वभारती विश्वविद्यालय, शांतिनिकेतन, मध्ये एका राष्ट्रीय परिसंवादाचे आयोजन फेब्रुवारी १९९५ मध्ये केले गेले होते. त्या प्रसंगी प्रा. अम्लान दत्त यांनी दिलेली दोन व्याख्याने प्रस्तुत ग्रंथात परिशिष्ट म्हणून समाविष्ट करण्यात आली आहेत. 'नव्या युगासाठीचे अर्थशास्त्र' हा विषय प्रा. दत्त यांनी या व्याख्यानांत मांडला आहे. त्याचा सारांश पुढे दिला आहे.

एखादा समाज आर्थिकदृष्ट्या संपन्न कसा बनतो, आजच्या अर्थशास्त्रीय परिभाषेमध्ये 'आर्थिक वाढ' कशी होते या प्रश्नाचे उत्तर शोधण्याभोवती 'क्लासिकल' या नावाने ओळखल्या जाणाऱ्या अर्थशास्त्रीय विचारप्रणालींची उभारणी झालेली होती. या अर्थाने ॲडम स्मिथ, डेव्हिड रिकार्डो, जॉन स्टुअर्ट मिल व कार्ल मार्क्स हे सर्व, प्रा. दासगुप्तांच्या मते, क्लासिकल अर्थशास्त्रज्ञ होते. उपलब्ध अर्थोत्पादक साधनस्रोतांचे विनियोग-वाटप (ॲलोकेशन) खुल्या अर्थव्यवस्थेत कसे होते, त्याची तत्त्वे कोणती यांच्या शोधांवर भर देणारे ते अर्थशास्त्र वेगळे. प्रा. दासगुप्ता यांच्या मते भारतासारख्या देशांच्या संदर्भात देशाची एकूण संपन्नता उच्च पातळी कशी गाठेल, एकंदर देशाची आर्थिक वाढ कशी साधावी हा विषय खरा महत्त्वाचा होता.

इंग्लिश भाषेतील 'वेल्थ' या शब्दाच्या अर्थाकडे थोडे ध्यान देऊया. ॲडम स्मिथच्या सुप्रसिद्ध ग्रंथाच्या मथळ्यात 'वेल्थ ऑफ नेशन्स' असा शब्दप्रयोग आहे. 'वेल्थ' म्हणजे धन, संपत्ती, लक्ष्मी असा अर्थ आहेच. पण तो एक अर्थ झाला. Wealth हा शब्द Weal पासून बनला आहे. Weal म्हणजे 'वेल-बिइंग' (कल्याणप्रद, चांगली स्थिती). या दोन्ही अर्थांनी स्मिथने या शब्दाचा प्रयोग केला होता.

आता, सर्व क्लासिकल अर्थशास्त्रज्ञ, आणि यामध्ये मार्क्सचाही समावेश आहे, भांवडलसंचय व गुंतवणूक हा सर्वाधिक महत्त्वाचा घटक मानतात. उत्पन्नामधून काही हिस्सा बाजूला टाकून तो भांडवल म्हणून गुंतवण्यामधून उत्पादन वाढते, आणि उत्पादनवाढीमधूनच आर्थिक वाढ होते, ही धारणा आढळते.

आर्थिक वाढीच्या प्रश्नाची चर्चा स्मिथ, रिकार्डो, मिल, मार्क्स या सर्व अर्थशास्त्रज्ञांनी केलेली दिसून येते. स्मिथ आणि रिकार्डो भांडवलशाही पद्धतीचा पुरस्कार करणारे होते तर मिल व मार्क्स समाजवादी उत्पादनपद्धतीचा पुरस्कार करत होते. भांडवलशाहीमध्ये कष्टकऱ्यांवर अन्याय होतो हे स्मिथ आणि रिकार्डो यांनाही दिसत होते; तरीपण भांडवलदार वर्गामुळे भांडवलसंचय व आर्थिक विकास होतो म्हणून भांडवलशाही त्यांना पसंत होती. मार्क्सलाही भांडवलदार वर्गामुळे भांडवलसंचय होतो हे मान्य होते. परंतु भांडवलशाहीतील वाढत्या अंतर्विरोधामुळे अखेरीस भांडवलशाहीपलीकडे, समाजवादाच्या दिशेने वाटचाल करणे अनिवार्य ठरते असे मार्क्सचे प्रतिपादन होते.

समाज जास्त धनवान बनला की तो आपोआप अधिक कल्याणप्रद, समाधानी, चांगला बनतो असे नाही हे सर्वच क्लासिकल अर्थशास्त्रज्ञांना दिसत होते. नुसतीच श्रीमंती वाढावी असे नाही तर, समाजाची स्थिती चांगली व्हावी, वेल-बिइंगचे मान वाढावे यासाठी काय करायला हवे?

शासनाने स्वतःच्या नियंत्रणाखाली, योजनापूर्वक आर्थिक वाढ घडवून आणणे हा एक उपाय मानला गेला आहे. आणि, समाजवादी समाज म्हणजे या भूमिकेमधून आर्थिक वाढ घडवून आणणारी शासनव्यवस्था असलेला समाज अशी एक विचारधारा आहे. या भूमिकेत प्रशासनाची, कायदा-सुव्यवस्था राखण्याची जबाबदारी शासनाने पार पाडावी आणि, त्याच वेळी, ही जबाबदारी पार पाडणाऱ्या नोकरशहांनी उद्योजकाचे गुण – धोका पत्करून नव्या वाटा चोखाळण्याचे साहस करण्याची वृत्ती, नियम व पठडी यांच्याबाहेर जाऊन नव्या कल्पना राबविण्याची अभिक्रमशीलता हे गुण – प्रकट करावेत अशी अपेक्षा बाळगलेली असते. अनुभव असे सांगतो की, उद्योग-व्यवसायांच्या उभारणी व भरभराटीसाठी आवश्यक उद्योजकाचे गुण आणि चांगल्या प्रशासनासाठी आवश्यक गुण हे एकत्र नांदू शकत नाहीत. थोडक्यात, राज्यकारभार आणि औद्योगिक साहस या दोन गोष्टी एकत्रित नांदू शकत नाहीत. यावर तोडगा म्हणून खाजगी क्षेत्रात उद्योगधंदे ठेवून शासनाने सामाजिक सुरक्षिततेचा – म्हणजे कामधंदा वा रोजगार नसणाऱ्यांनाही किमान जीवनमानाची हमी देणारे, बेकारभत्ता, मोफत औषधोपचार इत्यादी उपाय – कार्यक्रम खाजगी क्षेत्रातील कष्टकऱ्यांसाठी राबवावा असे सांगण्यात येते. परंतु ही

* *अतीतलक्ष्मी मानवतावाद* या लेखाचे संपूर्ण भाषांतर *नवभारत* वर्ष ५०, अंक ४-५, जाने.-फेब्रु., १९९७ मध्ये प्रसिद्ध झाले आहे.



अनुक्रमणिका

उपाययोजनासुद्धा तितकीशी समाधानकारक नाही. सामाजिक सुरक्षिततेमुळे फक्त किमान उपभोगाची व वैद्यकीय सुविधांची हमी मिळते. पण समाधानी, निकोप, उत्साहवर्धक जीवनासाठी माणसाला आणखी काहीतरी लागते. अनिसूर रहमान या अर्थशास्त्रज्ञाने विकासविषयक उपभोगवादी दृष्टिकोन आणि अर्थपूर्ण सृजनशील दृष्टिकोन (Consumerist approach and Creative approach) असा भेद केला आहे. नीतिशास्त्रीय आणि मानसशास्त्रीय दृष्टिकोनानुसार अर्थपूर्ण काम मिळवून देणारा रोजगार ही एक मूलभूत मानवी गरज मानली जाते. उपभोगासाठी शासनाकडून पुरेसा बेकारभत्ता मिळाल्याने ही गरज भागत नाही.

आजच्या आपल्या वास्तवाचे जरा आणखी निरीक्षण करू. व्यवस्था केंद्रीभूत नियोजनाचा पुरस्कार करणारी असो वा कल्याणकारी राज्य प्रस्थापित करणारी लोकशाही व्यवस्था असो, लोकशाही वा सर्वाधिकारी राज्यसत्ता यांचा उत्कर्ष यापैकी कोणत्याही व्यवस्थेमध्ये होऊ शकतो. आजच्या औद्योगिक युगाचे शस्त्रास्त्रसज्जता, शस्त्रास्त्रस्पर्धा आणि चंगळवादास प्रोत्साहन हे दोन प्रमुख विशेष आहेत. पृथ्वीच्या पर्यावरणीय व्यवस्थेचे असंतुलन आणि पर्यावरणाचे सर्वांगांनी व सर्वदूर प्रदूषण ही समस्या आज तीव्र बनली आहे. या समस्येचे भान वाढते आहे तशी आपली सामाजिक व आर्थिक प्रश्नांच्या सोडवणुकीविषयीची दृष्टी बदलत आहे. हे सर्व प्रश्न आज नव्या रूपांमध्ये समोर उभे ठाकले आहेत. अर्थशास्त्राची मांडणी हे प्रश्न व त्यावरील योग्य उपाययोजना यांना मध्यवर्ती ठेवून करावयास हवी आहे.

ज्या युगात आपण राहत असतो, ज्या समाजाची चिंता आपण करीत असतो तो समाज ज्या टप्प्यावर असतो, या दोन्हींचा संदर्भ – म्हणजे ऐतिहासिक संदर्भ – ध्यानात ठेवूनच 'अर्थशास्त्रा'ची मांडणी कोणत्या मध्यवर्ती मुद्यांच्या भोवती व लक्ष्यांना धरून करायला हवी ते ठरत असते वा ठरायला हवे, ही प्रा. दासगुप्ता यांची भूमिका योग्य होती.

आता, या चर्चासत्रामधील बरीचशी चर्चा राज्यसंस्थेने कोणती भूमिका बठवावी आणि बाजारपेठेचे अर्थव्यवस्थेत कोणते व किती स्थान असावे या दोन मुद्यांना धरून झाली. राज्यसंस्थेकडून आपल्या अपेक्षा एका प्रकारच्या असतात तर बाजारपेठेकडून दुसऱ्या प्रकारच्या. राज्यसंस्थेकडून विभिन्न अंगांनी संरक्षण मिळावे – परचक्रापासून, अंतर्गत चोरी-दरोडेखोरी, अव्यवस्था, आपल्या हिताच्या गोष्टींवरील बेकायदेशीर आक्रमण इत्यादींपासून संरक्षण – अशी अपेक्षा असते. आधुनिक काळात बेकारी, अपंगत्व, वृद्धत्व यासारख्या अवस्थांमध्ये सरकारने सामाजिक सुरक्षेच्या विविध उपायांच्या द्वारे किमान जीवनमानाची हमी द्यावी अशीही अपेक्षा असते. बाजारपेठेच्या चौकटीत, आपणांस लाभदायक विनिमय साधता यावा; दुसऱ्याचे नुकसान करून नव्हे, तसेच जबरदस्तीने, लाचारीने नव्हे तर राजीखुषीने श्रम-कौशल्य-बुद्धी यांसारख्या गोष्टींची, वा सेवा व वस्तू यांची देवाणघेवाण करता यावी ही अपेक्षा आपण राखतो. राज्यसंस्था व बाजारपेठ या दोन्ही सामाजिक संस्थांकडूनच्या या अपेक्षा रास्त आहेत. पण त्यांच्यात एक अंतरही आहे. बाजारपेठेतील विनिमयासाठी कायद्याच्या दृष्टीने वैध अशी एक सर्वसाधारण चौकट आखून देण्यापलीकडे, या रीतीभातींना अधिकृत मान्यता देण्यापलीकडे देवाणघेवाण करणाऱ्या पक्षांना 'संरक्षण' नसते, त्यांच्यावर निर्बंध नसतात. देवाणघेवाण फायद्याची ठरू शकते तशी नुकसानीची; तुमच्या-जवळ जे आहे ते कोणाला नको असले तर तुम्हांला बेकारी, दारिद्र्य, तोटा सहन करावा लागतो.

भारतात आज सरकारी सेवेत वा शासकीय मालकीच्या उद्योगात नोकरी मिळावी अशी फार मोठी मागणी आढळते. कारण या नोकरीत तुम्ही एकदा कायम झालात की, तुमची नोकरी म्हणजे उत्पन्न, जीवनमान इत्यादी गोष्टी आयुष्यभरासाठी सुरक्षित झाल्या याची हमी असते. अकार्यक्षमतेच्या, कामचुकार-पणाच्या वा 'इतकी माणसे नकोत' अशा कोणत्याही कारणाने शासन तुम्हांला काढून टाकू शकत नाही; कारण शासन हे संरक्षण देण्यासाठीच तर असते, ही मनोधारणा आहे. परिणाम असा होतो की, पुरेसे काम हातून होवो न होवो, नोकरी (व मिळकत) कायम राहील या कारणासाठी सार्वजनिक-सरकारी क्षेत्रात नोकरी मागितली जाते.

आता, खाजगी क्षेत्रात म्हणजे बाजारपेठेच्या चौकटीत, मला नोकरीवर लावून घेणारी व्यक्ती वा कंपनी स्वतःला लाभदायी ठरत नसेल तर मला नोकरीत संरक्षण देत नाही. जपानमध्ये खाजगी कंपन्याही 'संरक्षक पालका'ची भूमिका पार पाडतात. पण जपानची संस्कृती, समाजव्यवस्था व जपानी माणसाची मनोधारणा अशी आहे की, ज्यामुळे, किमान सुरक्षिततेचे आश्वासन देणाऱ्या मालकाला भरपूर काम देऊन, त्या मोबदल्यात लाभ पदरात पाडून घेण्यासाठी 'पाल्यां'चे – म्हणजे



अनुक्रमणिका

नोकरदार, कामगार यांचे – सहकार्य मिळते. ही गोष्ट आपल्या देशात सार्वजनिक-सरकारी क्षेत्रात घडणे अशक्य आहे. एखादी यंत्रणा वा कंपनी वा उद्योग सरकारी-सार्वजनिक आहे म्हटला की, ती/तो उत्तम कार्यक्षमतेने चालणे मनोधारणा, संस्कृती व नैतिकतेविषयीचे औदासिन्य यामुळे अशक्यच बनते.

अर्थव्यवस्था बहुतांशी खाजगी क्षेत्राच्या हातीच राहू द्यायची, आणि ती जो नफा कमावते त्यातला काही हिस्सा कररूपाने काढून घेऊन व वेगवेगळ्या योजना खाजगी क्षेत्रांना बंधनकारक करून, सामाजिक सुरक्षेच्या विविध उपाययोजना राबवून एक कल्याणकारी व्यवस्था प्रस्थापित करण्याचा मार्ग पाश्चात्त्य देशांमध्ये लोकशाही समाजवाद्यांनी (सोशल डेमोक्रॅट) अनुसरला. खुली बाजारपेठीय अर्थव्यवस्था कमी-अधिक प्रमाणात पण जवळपास अटळपणे बेकारी निर्माण करते. सर्वांना काम पुरवणे व वेतन/मजुरी देऊन 'सांभाळणे' ही तिची जबाबदारी नसते. अशा बेकार राहणाऱ्यांचा सांभाळ करण्याची व्यवस्था करण्याची जबाबदारी शासनाने उचलावी हा जो मार्ग पाश्चिमात्य देशांनी अनुसरला तो आपणांस अनुसरता येणार नाही.

का? तर आपल्या येथे 'प्रच्छन्न' बेकारीचे प्रमाण मोठे आहे, म्हणजे, बेकारी ही तात्कालिक अवस्था नाही; तर, पुष्कळ मोठ्या लोकसंख्येच्या बाबतीत ती एक कायमची (क्रॉनिक) स्थिती आहे. या लोकसंख्येत नित्य भर पडत आहे. आणि ज्यांना आधुनिक अर्थव्यवस्थेत नियमित रोजगार नाही अशांची संख्या आणखी पुष्कळ काळपर्यंत वाढतच जाणार आहे असे दिसते.

भारतामधील बेरोजगारीचे स्वरूप व्यापक व गुंतागुंतीचे असल्यामुळे पाश्चात्त्य देशांमधील 'सामाजिक सुरक्षा' उपायांचा मार्ग आपल्याला उपयोगी नाही.

आपल्याकडे खाजगी क्षेत्र आणि सार्वजनिक क्षेत्र या भेदाऐवजी औपचारिक संघटित क्षेत्र आणि अनौपचारिक असंघटित क्षेत्र असा विचार झाला पाहिजे. अर्थव्यवस्थेतले जे आधुनिक औपचारिक संघटित क्षेत्र आहे त्याला अनेक कारणांनी जागतिक अर्थव्यवस्थेचा भाग बनून, जागतिक बाजारपेठेत चालणाऱ्या स्पर्धेत टिकाव धरून यशस्वी होण्याइतकी कार्यक्षमता संपादन करायलाच हवी. यासाठी आवश्यक ते 'उच्च तंत्र'ही स्वीकारायला लागेल. याला पर्याय नाही. ही गोष्ट साध्य करण्यासाठी निष्ठुर बनावे लागेल; अस्थानी भूतदया दाखवून आपण अधिक गोत्यात येऊ.

मग इतक्या प्रचंड मोठ्या संख्येने जे बेरोजगार आहेत, आणि ज्यांना औपचारिक क्षेत्र आणखी बराच काळ काम देऊ शकणार नाही त्यांचा प्रश्न कसा सोडवावयाचा? अर्थशास्त्राची आजवर जी मांडणी झाली – ॲडम स्मिथच्या काळापासून ते थेट जॉन मेनार्ड केन्स यांच्या काळापर्यंत – ती या प्रश्नाला सामोरी जाऊन केलेली नव्हती; हे आव्हानच उपस्थित नव्हते.

औपचारिक संघटित क्षेत्राच्या व्यवहाराचे जे वळण राहणार आहे त्यापेक्षा अनौपचारिक असंघटित क्षेत्राचे वळण अगदी वेगळे राहावे लागेल ही गोष्ट स्पष्ट आहे. अर्थव्यवस्थेत या दोन क्षेत्रांचे अर्थपूर्ण सहअस्तित्व, समांतर पण परस्परसंवादी व सहकारी सहअस्तित्व ही दीर्घकाळ गरज राहणार आहे. अशी द्विदल अर्थव्यवस्था विचारात घेणे अर्थशास्त्राच्या अभ्यासकांना सोपे नाही. पण मधला एक टप्पा म्हणून या दिशेने अर्थशास्त्राची अनुरूप फेरमांडणी करण्याचे आव्हान पत्करले तरच ते उत्पादक व अर्थपूर्ण रोजगार उपलब्ध करून देण्यासाठी उपयोगी असे विधायक चिंतन करू शकतील.

तेव्हा, स्थानिक बेरोजगारांनी स्थानिक संसाधनांचा वापर करून स्थानिक गरजा भागविण्यासाठी सहकारी तत्त्वावर प्रयत्न केले पाहिजेत. जागोजागी स्थानिक लोकांच्या पुढाकारानेच अनौपचारिक उत्पादनक्षेत्र अस्तित्वात आले पाहिजे. भारतामध्ये पर्यायी अर्थव्यवस्थेला पर्याय नाही. देशीय जुन्या अर्थव्यवस्थेशी नाळेचा संबंध ठेवणारी, तिच्यातून निर्माण होणारी अनौपचारिक अर्थव्यवस्थाच देशातील बेरोजगारांना अर्थपूर्ण रोजगारीचे क्षेत्र उपलब्ध करून देऊ शकेल. आधुनिक औपचारिक क्षेत्राच्या जोडीला पारंपरिक अनौपचारिक क्षेत्राचा विकास हे दुभंगलेपण मानण्याऐवजी असे द्वैत राखणे भारतातील बेरोजगारी हटवण्यासाठी आवश्यक आहे, याचे भान ठेवले पाहिजे. जगाच्या पाठीवरील कोणत्याही देशातील कोणत्याही युगापेक्षा भारतातील आजचे युग वेगळे आहे, हे लक्षात ठेवून अनौपचारिक क्षेत्राला वाव देणारे, स्थानिक बेरोजगार व स्थानिक गरजांचा मेळ घालणारे नवे अर्थशास्त्र आपण विकसित केले पाहिजे.

या पुस्तकातील अर्थशास्त्रीय विश्लेषण नेमकेपणानेपण साध्या, सरळ सोप्या भाषेत झाले आहे. लेखकाची भूमिका ठाम असली तरी त्यात कोठेही कर्कशतेचा वा आक्रमकतेचा सूर नाही. पुस्तकाची भाषाशैली शांत, सौम्य, ऋजू, अभिनिवेश-रहित आणि संयत आहे. पुस्तकाच्या शीर्षकाला ती शोभून दिसते. विषयाचे विवेचन शास्त्रीय असले तरी लेखनपद्धती सुबोध असल्यामुळे हा ग्रंथ वाचनीय व आकलनीय झाला आहे.

अनुक्रमणिका

# भारताचार्य चिं.वि. वैद्य

**मे.पुं. रेगे**

'महाराष्ट्राचे उपेक्षित मानकरी' हे वर्णन गं.बा. सरदारांनी प्रचारात आणले आणि अनेक उपेक्षित व्यक्तींच्या थोरवीचे आणि कार्याचे स्मरणही महाराष्ट्राला करून दिले. प्राचीन भारतीय साहित्य, भारतीय संस्कृती, मध्ययुगीन भारताचा व मराठ्यांचा इतिहास इ. संशोधनाच्या क्षेत्रांत ज्यांनी अतुल कामगिरी बजावली ते कै. भारताचार्य चिंतामण विनायक वैद्य हे असेच एक उपेक्षित राहिलेले व्यक्तिमत्त्व आहे. त्यांचे पुन:स्मरण महाराष्ट्राला करून देण्यासाठी त्यांचे नातू प्रा. नारायण भालचंद्र वैद्य ह्यांनी डॉ. द.भि. कुलकर्णी यांच्या सहकार्याने संपादन करून प्रसिद्ध केलेला 'भारताचार्य, चिं.वि. वैद्य स्मृतिग्रंथ' हा ग्रंथ स्वागतार्ह आहे. अशा ग्रंथाची अत्यंत जरुरी होती.

कोणतेही निकष लावले तरी चिं.वि. वैद्य ही असामान्य, उत्तुंग कर्तृत्वाची व्यक्ती होती असाच निर्णय होईल. त्यांची बुद्धिमत्ता कुशाग्र होती हे विद्यापीठाचा अभ्यासक्रम पार पाडताना त्यांनी पटकावलेल्या पारितोषिकांवरून सहज ध्यानात येईल. गणित विषय घेऊन ते मुंबई विद्यापीठाच्या बी.ए. व एम्.ए. या परीक्षांत पहिल्या वर्गात पहिल्या क्रमांकाने उत्तीर्ण झाले. वाटेत त्यांनी मॅट्रिकला बाई माणेकजी जिजीबाई पारितोषिक, प्रीव्हिअसला (पहिल्या वर्षी) संस्कृतसाठी जगन्नाथ शंकरशेट पारितोषिक, बी.ए.ला इंग्लिशमध्ये एलिस प्राइज व ड्यूक ऑफ यॉर्क फेलोशिप, करसनदास मूळजी मेडल आणि कुलपती सुवर्णपदक हे सन्मान मिळवले.

वैद्यांनी निर्माण केलेली ग्रंथसंपदा पाहूनच मन स्तंभित होते. त्यांच्या लहानमोठ्या ग्रंथांची यादी २९ एवढी भरते. त्याशिवाय त्यांचे अनेक लेख असंग्रहित राहिले आहेत. *महाभारत – ए क्रिटिसिझम*, *रिडल ऑफ रामायण*, *दुर्दैवी रंगू* (कादंबरी), *मध्ययुगीन भारत* (३ भाग), *महाभारताचा उपसंहार*, *संयोगिता* (नाटक) हे त्यांतले काही ठळक ग्रंथ होत. *शिवाजी*, *द फाउण्डर ऑफ मराठा स्वराज* आणि *हिंदु धर्माची तत्त्वे* हेही उल्लेखनीय ग्रंथ आहेत. ह्या ग्रंथांच्या बाबतीत एक गोष्ट ध्यानात घेतली पाहिजे. केवळ ग्रंथालयात वाचन करून लाभलेल्या सामग्रीवर आधारलेले हे ग्रंथ नाहीत. शिलालेख, ताम्रपट इत्यादींचे वाचन, ऐतिहासिक प्रसंग ज्या स्थळी घडले त्यांना प्रत्यक्ष भेट देऊन, परिसराचे निरीक्षण करून जमविलेली वरीचशी विश्वसनीय माहिती, जुन्या पोथ्या, अमुद्रित हस्तलिखिते जमवून त्यांच्यातून निवडून घेतलेला पुरावा ह्यांच्या आधारे त्यांनी आपल्या ऐतिहासिक ग्रंथांची निर्मिती केली. मध्ययुगीन भारताच्या इतिहासावर त्यांनी जे लेखन केले ते एखाद्या बुद्धिमान व्यासंगी व्यक्तीला आयुष्यभर पुरेल एवढे काम होते. पण तो वैद्यांच्या संशोधनकार्याचा केवळ एक भाग होता.

चिंतामणरावांचे लौकिक जीवन थोडक्यात असे सांगता येईल : त्यांचा जन्म सन १८६१ साली सुखवस्तू कुटुंबात झाला. त्यांचे वडील कल्याणला यशस्वी वकील होते. विद्यार्थिदशेत त्यांनी मिळविलेल्या यशाचा उल्लेख वर झालाच आहे. त्यांनी ॲडव्होकेटची परीक्षा दिली. १८८७ मध्ये ग्वाल्हेर संस्थानात सेशन्स जज्जांची नोकरी त्यांनी स्वीकारली. आठ वर्षांनी त्यांना पदोन्नती लाभून ते 'चीफ जस्टिस' झाले. हिंदू स्त्रियांच्या तत्कालीन स्थितीविषयीची त्यांची आठ लेखांची 'अबलोन्नती लेखमाला' १८९० ते १८९५ पर्यंत प्रसिद्ध झाली. ह्या लेखमालेमुळे त्यांनी लोकमान्यांचे लक्ष वेधून घेतले. *महाभारत – ए क्रिटिसिझम*, *रिडल ऑफ रामायण व एपिक इण्डिया* हे ग्रंथ अनुक्रमे १९०४, १९०६ व १९०७ साली प्रसिद्ध झाले. लोकमान्यांनी ह्या ग्रंथांचे 'केसरी'त सविस्तर परीक्षण केले. १९०५ मध्ये ग्वाल्हेरहून स्वेच्छानिवृत्ती घेऊन कल्याणला परतल्यावर लोकमान्यांच्या आमंत्रणाचा स्वीकार करून त्यांनी लोकमान्यांच्या राजकीय कार्यात त्यांना मनापासून साथ दिली. काँग्रेसच्या अधिवेशनात [कलकत्ता (१९०५) ते अमृतसर

* *भारताचार्य चिं.वि. वैद्य स्मृतिग्रंथ*, संपादक : डॉ. द.भि. कुळकर्णी, प्रा. नारायण भालचंद्र वैद्य; प्रकाशक : प्रा. नारायण वैद्य, सचिव, भारताचार्य चिं.वि. स्मृतिग्रंथ समिति, नागपूर; मूल्य रु. १५०/-.







अनुक्रमणिका

(१९१९)] त्यांनी टिळकांचे अनुयायी म्हणून सहभाग घेतला. टिळकांच्या मृत्यूनंतर त्यांनी गांधीजींचे अनुयायित्व स्वीकारले. टिळक महाराष्ट्र विद्यापीठाच्या स्थापनेत आणि ते चालविण्यात त्यांनी उत्साहाने भाग घेतला. ह्या विद्यापीठाचे ते पहिले कुलगुरू होते. २० एप्रिल १९३८ रोजी त्यांचे निधन झाले.

वाचन, संशोधन, त्यानिमित्ताने अडचणींच्या स्थळी केलेला प्रवास आणि लेखन यात बुडून गेलेला हा माणूस नेहमीच्या आयुष्यात रुक्षतेने वावरत असेल अशी कुणी कल्पना करील. पण वस्तुस्थिती तशी नव्हती. वैद्यांना तालमीचा, शरीर कमावण्याचा षोक होता. मोठ्या अधिकाराच्या स्थानी असतानाही व्यायामासाठी रस्त्याने धावत जाताना लोकांनी त्यांना पाहिले आहे. त्यांना सतारवादनाचाही छंद होता. 'चिंतामणराव हाडाचे रसिक होते. ग्वाल्हेरला असताना प्रसिद्ध सतारिया अमीरखा यांचेजवळ सतार शिकले व त्यांच्याकडून पुष्कळशा चीजा पैदा केल्या. सतारीच्या गतीवर त्यांनी एक ग्रंथ लिहिला होता... कल्याणला असताना मौलवीजवळ ते फारसी शिकले होते... घोड्यावर बसणे उत्तम प्रकारे जाणत होते.' (पृ. ३९). माणसांत मिसळणेही त्यांना आवडे. 'न.चिं. केळकर यांनी म्हटल्याप्रमाणे "त्यांची राहणी साधी असे, डामडौल मुळीच नव्हता. स्वभाव इतका विनोदी की त्यांच्या कोट्या ऐकून व त्यांच्याशी गप्पा करण्यात तासचे तास मौजेने निघून जात. त्यांच्याइतका बहुश्रुत महाराष्ट्रात क्वचित आढळेल." '(पृ. ३९)

वयाच्या सत्तराव्या वर्षी चिंतामणरावांनी तरुणांना केलेला उपदेश मोलाचा आहे. ते म्हणतात, "माझ्या ग्रंथ लिहिण्याचे रहस्य सतत व्यासंग हे आहे. नुसत्या बुद्धीने काम होत नाही. म्हणून केवळ बुद्धीवर अवलंबून राहू नका. व्यासंग करा व त्यासाठी आपले शरीर चांगले कमवा." (पृ. ४०)

चिंतामणरावांच्या संशोधनाचा मध्यवर्ती विषय भारताचा इतिहास हा आहे असे सारांशाने म्हणता येईल. ह्याचे स्थूलमानाने दोन भाग पडतात. रामायण, महाभारत इ. संस्कृत इतिहासवजा ग्रंथांतून ह्या देशाच्या प्राचीन इतिहासाची केलेली सिद्धता हा एक आणि मध्ययुगीन हिंदू भारताचा आणि मुसलमानी आक्रमणाने केलेल्या त्याच्या पाडावाचा इतिहास हा दुसरा. ह्या दुसऱ्या भागाला शिवाजीच्या नेतृत्वाखाली महाराष्ट्राच्या झालेल्या उत्थानाच्या इतिहासाची जोड दिली पाहिजे. गणिताचे अभ्यासक असलेले चिंतामणराव भारताच्या प्राचीन व मध्ययुगीन इतिहासात रमले ह्याचे एक कारण आहे असे मला वाटते. रेनेसान्सपासून आणि विशेषतः एकोणिसाव्या शतकापासून युरोपीय संशोधकांनी ग्रीक आणि रोमन संस्कृतींचा चिकित्सक ऐतिहासिक दृष्टीने अभ्यास केला होता व अशा अध्ययन-अध्यापन-संशोधनाची परंपरा युरोपमध्ये स्थिर झाली होती. ग्रीक आणि रोमन संस्कृतींविषयीचे हे कुतूहल ही केवळ 'शुद्ध' जिज्ञासा नव्हती. ही आपली, विशिष्ट अशी युरोपीय संस्कृती आहे, आपली पाळेमुळे ह्या संस्कृतींत रुजलेली आहेत, जगाला व्यापू पाहणारी आधुनिक युरोपीय संस्कृती हे ह्याच ग्रीकोरोमन संस्कृतीचे प्रगत रूप आहे, केवळ ह्या संस्कृतीमध्ये प्रगतीचे, विकासाचे बीज आहे, इतर संस्कृती (चिनी, भारतीय इ.) ह्या एका मर्यादेपर्यंत प्रगत होतात आणि मग कुंठित होऊन स्थिरावतात, फक्त युरोपीय संस्कृती सातत्याने प्रगतिशील राहते अशी प्रकट किंवा सुप्त धारणा ह्या संशोधनामागे होती. ह्या संशोधनाद्वारे युरोप आपला सांस्कृतिक वारसा आत्मसात करीत होता व जतन करीत होता. पण हे करताना ह्या संशोधकांनी चिकित्सक, ऐतिहासिक दृष्टिकोणाचा स्वीकार बऱ्याच प्रमाणात केला होता ह्यात संशय नाही. उदा., प्राचीन ग्रंथांच्या मूळ आवृत्त्या कशा होत्या ह्याचा निर्णय, वेगवेगळ्या उपलब्ध हस्तलिखितांत आढळणारे पाठभेद ध्यानात घेऊन, कसा करावा ह्याच्या रीती त्यांनी विकसित केल्या. प्राचीन ग्रंथांच्या आशयाचे विरूपण, संहितांचे अर्थनिर्णयन करतानाही, ह्या ग्रंथांत ज्या घटनांचे, कृत्यांचे निवेदन आले असेल त्यांचा काल कोणता असेल, कोणत्या सामाजिक, राजकीय, तंत्रज्ञानात्मक, धार्मिक इत्यादी परिस्थितीच्या संदर्भात ह्या घटना, ही कृत्ये घडून आली असतील ह्या साऱ्याचा विचार करून त्या त्या ग्रंथातील निवेदनाचा अर्थ लावण्याची पद्धतीही त्यांनी स्वीकारली. सर्व प्रकारच्या संस्कृत साहित्याच्या बाबतीत परिस्थिती अशी होती की, हा सर्व ठेवा पंडितांच्या अखत्यारीत होता. मराठी इत्यादी आधुनिक भाषांत तो अवतरला नव्हता. मूळ संस्कृत ग्रंथांच्या आधारे लिहिलेले अध्यात्मिक, धार्मिक, ग्रंथ काय ते मराठीत उपलब्ध होते – उदा. *ज्ञानेश्वरी*, *एकनाथी भागवत* इ. तुकारामाचे अभंगही भागवत संप्रदायाच्या तात्त्विक, नैतिक वृत्तीने ओतप्रोत भरलेले होते. ह्या मराठी ग्रंथांनी लोकशिक्षणाचे बहुमोलू कार्य मोठ्या प्रमाणावर केले यात शंका नाही. पण आपला सांस्कृतिक वारसा आत्मसात करायचा तर सबंध संस्कृत साहित्याला सुशिक्षित मराठी समाजाच्या


अनुक्रमणिका

जाणिवेत महत्त्वाचे स्थान असले पाहिजे ही गोष्ट पाश्चात्त्य शिक्षण घेतलेल्या नवशिक्षितांच्या अग्रणींना जाणवली. सुशिक्षित मराठी समाजासाठी त्यांनी आपल्या प्राचीन वारशाचे, भारतीय अस्मितेला आधारभूत असलेल्या सांस्कृतिक संचिताचे पुनरुज्जीवन केले. पण हे करताना पाश्चात्त्य संशोधकांपासून स्वीकारलेल्या ऐतिहासिक, चिकित्सक दृष्टिकोणाची, पद्धतीची कासही त्यांनी धरली. काशिनाथ त्र्यंबक तेलंग, भाऊ दाजी लाड, रा.गो. भांडारकर, लोकमान्य टिळक इत्यादींनी संस्कृत साहित्याच्या संशोधनाची जी परंपरा स्थापन केली तो भारतीय राष्ट्राच्या पुनरुत्थानाच्या प्रक्रियेचा भाग होता. ह्या नामावळीत वैद्यांचे नाव शोभून दिसते.

भारतीय साहित्याचे व प्राचीन इतिहासाचे त्यावेळचे पाश्चात्त्य संशोधक आणि भारतीय संशोधक ह्यांच्यात एक सूक्ष्म आणि काहीशी अवगुंठित अशी तेढ दिसून येते. रामायण, महाभारत, इ. आर्ष महाकाव्यांची असामान्य श्रेष्ठता पाश्चात्त्यांना नाकारता येणे शक्य नव्हते. पण भारतीय स्वतंत्रपणे एवढ्या श्रेष्ठ दर्जाची निर्मिती करू शकतील हेही त्यांना पटत नव्हते. तेव्हा ही सर्व निर्मिती, तसेच ज्योतिष-शास्त्र, दर्शने इ. विषयांत प्राचीन भारतीयांनी केलेली प्रगती, ग्रीक उदाहरणांपासून प्रेरणा घेऊन, त्यांची नक्कल करून भारतीयांनी साधली असणार असा पूर्वग्रह पाश्चात्त्यांच्या मनात होता. ह्याचा एक परिणाम असा की वेद, स्मृती, रामायणादी आर्षकाव्ये इ. साहित्य फारसे प्राचीन नाही, तुलनेने अलीकडले आहे असे मानण्याकडे त्यांचा कल होता. उलट, भारतीय संशोधक भारतीय निर्मितीची स्वायत्तता, स्वयंस्फूर्तता आणि तिची प्राचीनता सिद्ध करण्याचा प्रयत्न करीत. हा वाद आता मागे पडला. भारतीय संस्कृतीची स्वायत्तता आता सर्वमान्य झाली आहे. भारतीयांनी ग्रीकांकडून किती व कोणती उसनवारी केली व ग्रीकांनी किती व कोणती केली ह्या प्रश्नाकडे तटस्थपणे पाहणे आज शक्य झाले आहे.

प्राचीन भारतीय संस्कृती फिरून हस्तगत करण्याचा प्रयत्न करणाऱ्या ह्या संशोधनाचे प्रमुख भाषिक माध्यम अपरिहार्यपणे इंग्रजी भाषा हे राहिले. कारण हे पुनःस्थापन सबंध भारतीयांसाठी होते आणि (संस्कृत सोडली) तर अखिल भारताची संपर्कभाषा आणि आधुनिकांची एकमेव संपर्कभाषा ही इंग्रजीच होती. शिवाय पाश्चात्त्य विद्वानांशी ह्याच भाषेद्वारे संपर्क ठेवता येत होता. तेव्हा तेलंग, भांडारकर, टिळक यांनी आपले संशोधनपर ग्रंथ इंग्रजीत लिहिले. वैद्यांनीही आपले *महाभारत – ए क्रिटिसिझम*, *रिडल ऑफ रामायण*, *एपिक इण्डिया*, *मिडिव्हल हिंदु इण्डिया* इ. ग्रंथ इंग्रजीतून लिहिले. पण गीतेची शिकवण कर्मयोगाची आहे हे आपले हृद्गत जेव्हा टिळकांना सांगायचे होते तेव्हा त्यांनी *गीतारहस्य* मराठीत लिहिले. वैद्यांनीही टिळकांच्या सूचनेवरून लिहिलेला *महाभारताचा उपसंहार* हा ग्रंथराज मराठीत लिहिला. शिवाय मराठीत त्यांनी अनेक पुस्तके लिहिली. त्यांचे विषय मुख्यतः धर्मपर, इतिहासपर आहेत. ह्याचा अर्थ असा की, भारतीय समाजाच्या पुनरुत्थानाच्या प्रक्रियेला साहाय्यभूत होणारे ग्रंथ लिहिणाऱ्या मराठी विचारवंतांचा वाचकवर्ग इंग्रजी भाषक व मराठी भाषक असा दुहेरी असणार याची जाणीव या विद्वानांना होती. तत्त्वज्ञान, सामाजिक शास्त्रे, इतिहास, निसर्गविज्ञाने इ. विविध ज्ञानशाखांच्या महाराष्ट्रीय विद्वानांनी टिळक, वैद्य यांचे ह्या बाबतीत अनुकरण केले पाहिजे. प्राचीन भारतीय साहित्यात वैद्य यांनी केलेले संशोधन हे एक राष्ट्रकार्य, राष्ट्रसेवेचा एक प्रकार होता ह्याचा प्रत्यय टिळक आणि नंतर गांधीजी ह्यांच्या राजकीय कार्यात त्यांनी सक्रियपणे भाग घेतला यावरून येतो.

वैद्यांचे समग्र मराठी साहित्य मराठी वाचकांना सदैव उपलब्ध असले पाहिजे. त्यांच्या दुर्मिळ ग्रंथांचे पुनर्मुद्रण करण्याची योजना साहित्य संस्कृती मंडळाने हाती घ्यावी अशी शिफारस करावीशी वाटते. यांतील काही पुस्तकांचे महत्त्व आज प्रामुख्याने ऐतिहासिक राहील. उदा. *हिंदू धर्माची तत्त्वे* (१९३१) किंवा *अबलोन्नती लेखमाला* (१९०६). परंतु वैद्यांसारख्या विद्वान, विचारी व समतोल मनोवृत्तीच्या व्यक्तीने हिंदू धर्माविषयीच्या प्रश्नांना किंवा स्त्रियांच्या परिस्थितीत सुधारणा करण्याच्या चळवळीला कोणत्या प्रकारे प्रतिसाद दिला याची माहिती करून घेणे नेहमीच उपकारक ठरेल.

*भारताचार्य* हे पुस्तक वाचून अनेक अधिकारी पंडितांनी वैद्यांच्या कामगिरीच्या विविध पैलूंशी करून दिलेला परिचय ध्यानात घेतला की एक प्रश्न मनात स्वाभाविकपणे उद्भवतो. आज शिक्षणाचा एवढा प्रसार झालेला असतानाही वैद्यांच्या बौद्धिक ताकदीची माणसे इतकी कमी का आढळतात? की ती पुरेशा संख्येने आहेत पण काही कारणाने त्यांची ओळख आपल्याला पटत नाही?

**








# *अबलोन्नती लेखमाला*

**वेणू पळशीकर**

ग्वाल्हेर संस्थानचे माजी मुख्य न्यायाधीश चिं.वि. वैद्य यांचा वरील शीर्षकाचा ग्रंथ १९०६ मध्ये प्रसिद्ध झाला असला, तरी त्यात अंतर्भूत असलेल्या आठ लेखांपैकी सहा लेख त्यांनी १८९० मध्ये लिहिले होते. सातवा लेख १८९५ मध्ये आणि आठवा लेख १९०५ मध्ये लिहून पुरा केला होता असे प्रस्तावनेत नमूद करण्यात आले आहे. या सर्व लेखांना प्रथम प्रसिद्धी 'केसरी', 'नेटिव ओपिनियन', 'इंदुप्रकाश' या वर्तमानपत्रांमधून मिळालेली होती. त्या काळचे वडोद्याचे स्त्री-सुधारणाप्रिय नरेश सयाजीराव गायकवाड यांच्या सहधर्मचारिणी महाराणी चिमणाबाई गायकवाड ह्यांना प्रस्तुत ग्रंथ अर्पण करण्यात लेखकाने औचित्य दाखवले.

सामाजिक सुधारणांसाठी आवश्यक असलेली वातावरणनिर्मिती कशामुळे होऊ शकते, विवाहसंस्थेच्या उदयाचा व विकासाचा इतिहास, भारतातील बालविवाह पद्धतीचा इतिहास व ती शास्त्रसंमत नसल्याचा दावा, विधवाविवाहाचा प्रश्न व त्या संदर्भात अप्राप्तमैथुना विधवा व प्राप्तमैथुना विधवा यांमध्ये करण्यात आलेला फरक, जेथे कमीत कमी विरोध होण्याची शक्यता असेल त्या सुधारणेपासून सुरुवात करण्यावर दिलेला भर व हिंदू स्त्रियांच्या दृष्टीने स्त्री-शिक्षणाची दिशा कोणती असावी असे प्रमुख विषय या आठ लेखांमधून चर्चिले आहेत.

कोणत्याही सुधारणेसाठी जनमानस तयार केल्याशिवाय केवळ कायद्याने काम होत नाही. १८५६ मध्ये ब्रिटिश राज्यकर्त्यांनी भारतात पुनर्विवाहास संमती देणारा कायदा पास केला. पण जनमत अनुकूल नसल्यामुळे तो निष्फळ ठरला. जनमत तयार करण्यासाठी आधुनिक पाश्चात्त्य विचारवंतांची मते, तसेच प्राचीन संस्कृत भाषेतील शास्त्रार्थ, या सर्व गोष्टी लोकांना त्यांच्या भाषेत उपलब्ध करून दिल्या पाहिजेत. ते काम या ग्रंथाने फार परिणामकारकपणे साधले आहे. सुधारणाविषयक लेखनामध्ये अतिशयोक्त विधाने करून जुन्या समाजास दुखावता कामा नये. मलबारींनी पुनर्विवाहाचे समर्थन करण्याच्या ओघात 'बहुसंख्य हिंदू विधवा व्यभिचारिणी असतात' असे अतिशयोक्त विधान केल्यामुळे सुधारकांबद्दल लोकमत प्रतिकूल बनले, ते टाळायला हवे होते असे या संदर्भात लेखकाने दाखवून दिले आहे. सुधारकाने स्वतःच्या आचरणात सुधारणा आणली पाहिजे. न्यायमूर्ती रानडे यांनी विधुरदशेत विवाह करताना प्रौढ विधवेशी विवाह करण्याऐवजी कोवळ्या वयाच्या रमाबाईंशी विवाह करण्यास, नाइलाजाने का होईना, संमती दिली हे उग्र नीतीच्या तत्त्वानुसार अयोग्य असले तरी, लेखकानेच आधी म्हटल्याप्रमाणे, जुन्या मताच्या लोकांना झेपेल त्या गतीनेच सुधारणेचे पाऊल टाकावे लागते. पण विवाहानंतर रमाबाईंच्या शिक्षणासाठी न्यायमूर्तींनी जातीने घेतलेली मेहनत या संदर्भात लक्षात घेण्याजोगी आहे.

'विवाहसंस्थेचा इतिहास' हा लेख स्पेन्सरच्या समाजशास्त्रावर आधारलेला आहे असे खुद्द लेखकानेच म्हटले आहे. इतर प्राणी आपल्या जातीतल्या प्राण्यांना ठार मारत नाहीत पण मनुष्यप्राणी लढाया करून एकमेकांना ठार करतात. या लढाऊ प्रवृत्तीमुळे विवाहसंस्था उदयास आली असे स्पेन्सरचे मत लेखकाने उद्धृत केले आहे. जेते झालेल्या टोळीतील पुरुष जित टोळीतील स्त्रियांना भोगदासी म्हणून वापरत. त्यामुळे एकंदर स्त्रीवर्ग पुरुषवर्गापेक्षा कनिष्ठ प्रतीचा मानला जाऊ लागला. परंतु सततच्या लढायांचा काळ संपुष्टात येऊन शांततेचा काळ जसा प्रस्थापित झाला तसा माणूस जास्त सुसंस्कृत बनला. स्त्री-दाक्षिण्याचा – अबलाभिमानाचा काळ – शिव्हलरीचा काळ – विकसित झाला. स्त्री-पुरुषांमधील परस्परनिष्ठा, स्त्री-प्रेम, एकपत्नीव्रत इ. सद्गुण रामायणकाळात दिसून येतात. होमरच्या इलियडच्या काळात दिसून येत नाहीत. म्हणजे त्या काळी हिंदू समाज ग्रीक समाजापेक्षा जास्त सुधारलेला होता असे म्हणता येईल. सीतास्वयंवराच्या उल्लेखावरून हा काळ अबलाभिमानित्वाचा होता असे लेखकाने म्हटले आहे. पण याच ग्रंथातील शेवटच्या लेखात "स्त्रियांनी काही विशिष्ट प्रसंग सोडल्यास पुरुषसमाजाचे दर्शनही घेऊ नये, पडदानशीन राहावे" अशा अर्थाचा रामाच्या तोंडचा एक श्लोकही लेखकाने उद्धृत







अनुक्रमणिका

केला आहे.[१] या दोन विधानांत विसंगती आढळते. "सीता-द्रौपदी इ. स्त्रियांच्या वेळेस हिंदुस्थानात बायकांची अत्युत्तम स्थिती होती" हे लेखकाचे विधान सीतात्याग व द्रौपदीला पणाला लावून तिचे नंतर झालेले वस्त्रहरण या घटनांकडे दुर्लक्ष करणारे वाटते.

फार प्राचीन काळी म्हणजे आर्यकाळात व त्यानंतरही ह्युएनत्संग भारतात येऊन गेला तोपर्यंत, म्हणजे आर्य-बौद्ध काळात भारतामध्ये स्त्रियांची लग्ने प्रौढ वयात होत असत. त्यांचे मौंजीबंधन[२] होऊन त्या विद्या संपादन करू शकत असत. विवाहबंधन सक्तीचे नव्हते. त्या अविवाहित राहून ब्रह्मवादिनीही होऊ शकत असत. पुराणांमध्येही सीता, दमयंती, देवयानी या क्षात्र व ब्राह्मण कन्यांनी आपल्या पसंतीने आपला पती निवडल्याचे दाखले आहेत. मनूनेसुद्धा ऋतुप्राप्तीनंतर पित्याने तीन वर्षेपर्यंत केव्हाही कन्येचे लग्न करावे असे म्हटले आहे व नंतर कन्येने स्वतःचे लग्न ठरवल्यास त्यात पित्याला मुळीच दोष दिलेला नाही.[३]

इ.स. ८०० च्या सुमारास शंकराचार्यांच्या प्रेरणेने हिंदुधर्माने बौद्ध धर्मावर मात करून भारतातील बौद्ध धर्मप्रसारास आळा घातला. त्या सुमारास हिंदुधर्मामध्ये जे फेरफार करण्यात आले, त्यांनुसार बालविवाहपद्धती हिंदू स्त्रियांना लागू करण्यात आली असावी. बौद्ध भिक्षुणींच्या अनैतिक वागणुकीमुळे लोकमत कलुषित झाले होते. मुलींना विवाहबंधन सक्तीचे केल्यास व त्यांचे विवाह व्रतबंधाच्या वयात म्हणजे आठव्या वर्षीच उरकल्यास त्यांना भिक्षुणी बनण्यास वाव राहणार नाही या दृष्टीने हिंदुधर्मात ही प्रथा सुरू झाली, असे प्रस्तुत ग्रंथाच्या लेखकाचे मत आहे. मेगॅस्थिनीस, ह्युएनत्संग या परकीयांच्या वृत्तान्तांत त्यांच्या काळी भारतात बालविवाह असल्याचा उल्लेख आढळत नाही. मुसलमानी अंमल भारतातील वेगवेगळ्या प्रदेशांत इ.स. १००० नंतर इ.स. १४०० पर्यंत सुरू झाला. त्यापूर्वीच भारतात बालविवाहाची पद्धत सुरू झाली होती असे इ.स. १००० च्या सुमारास भारतात येऊन गेलेल्या अल्बेरुणी या अरब इतिहासकाराने म्हटले आहे.

या जगात एकच कार्य अनेक कारणांच्या एकीभूत परिणामांमुळे घडते त्याप्रमाणेच राष्ट्राची उन्नती अनेक कारणांच्या समन्वयामुळे होते. परंतु चांगली विवाहपद्धती काही अंशी राष्ट्राच्या उन्नतीस कारणीभूत असते, हा स्पेन्सरचा सामाजिक सिद्धान्त इतिहासावरून खरा ठरतो असे दाखवून देताना ग्रंथकाराने म्हटले आहे की, "बार्बेरियन लोकांवर ग्रीक लोकांनी जे वर्चस्व संपादन केले त्याचे एक कारण ग्रीक लोक आपल्या बायकांस गुलामाप्रमाणे न मानता आपल्या बरोबरीच्या व संसाररहाटीत सहचारिणी आहेत असे मानीत हे होय, असे ॲरिस्टॉटलचे मत आहे." ग्रंथकाराचे हे विधान *सत्याग्रही सॉक्रिटिसचे वीरमरण* (ले. वसंत पळशीकर) या पुस्तकातील खालील विधानाशी विसंगत वाटते. उपर्युक्त पुस्तकात पृ. २० वर म्हटले आहे, "सॉक्रेटिसच्या काळात स्वतंत्र नागरिकांमध्ये बायकांचाही समावेश होत नसे. त्यांना दलित समजले जाई. स्वतंत्र नागरिकाने स्वतःच्या व कुटुंबाच्या पोषणाची चिंता करू नये. त्यासाठी गुलाम व घरच्या स्त्रिया आहेतच."

भारतात बालविवाह रूढ झाले तेव्हासुद्धा, घरातील धर्मकृत्ये करण्यासाठी व प्रजोत्पत्ती करण्यासाठी सक्षम अशा वयात, म्हणजे आठव्या वर्षापेक्षा शक्य तितक्या उशिरा, पण ऋतुप्राप्तीच्या आसपास मुलीचा विवाह केला असता उत्तरोत्तर अधिकाधिक पुण्य पित्याला मिळते असे म्हटले जात होते.[४] आठ वर्षांच्या मुलीचा विवाह 'गौरीविवाह', नऊ वर्षांच्या मुलीचा विवाह 'रोहिणी-विवाह' व त्यानंतर ऋतुप्राप्तीपर्यंतच्या आसपास मुलीचा विवाह केला असता त्याला 'कन्याविवाह' असे संबोधण्यात आले आहे. गौरीविवाहामुळे नाकपृष्ठ (स्वर्ग), रोहिणीविवाहामुळे वैकुंठ व कन्याविवाहामुळे ब्रह्मलोकाची प्राप्ती

---

१. पुस्तकाच्या पृ. ५६२ वर दिलेला हा श्लोक खालीलप्रमाणे आहे :
व्यसनेषु च कृच्छ्रेषु न युद्धे न स्वयंवरे। न ऋतौ न विवाहे च दर्शनं दुष्यते स्त्रियः।।

२. पुस्तकाच्या पृ. २९१ : 'पुरा कल्पे तु नारीणाम् मौजीबंधनमिष्यते' असा स्त्रियांच्या व्रतबंधाचा उल्लेख आहे.

३. पुस्तकाच्या पृ. ३४१ वर दिलेले मनुस्मृतीतील वचन खालीलप्रमाणे आहे :
'त्रीणि वर्षाण्युदीक्षेत कुमार्तृमती सती। ऊर्ध्वं तु कालादेतस्माद्विंदेत सदृशं पतिम्'।।

४. पुस्तकाच्या पृ. ३५२ वर या संदर्भात दिलेले मरीचीवचन खालीलप्रमाणे आहे :
'गोर्यादि विवाहे यथोत्तरं फलविशेषमाह'।।

पित्यास होते असे शातातप स्मृतिवचन लेखकाने दिले आहे.[५] असे असूनसुद्धा शास्त्रापेक्षा रूढी श्रेष्ठ मानून आठव्या वर्षीच नव्हे तर पाळण्यातच विवाह लागू लागले व बालविधवांची भयानक समस्या या देशात निर्माण झाली. या संदर्भात लेखकाने १८९१ च्या खानेसुमारीनुसार हिंदू विधवांच्या संख्येचे वयानुसार दिलेले आकडे बोलके आहेत. ते असे :

१३,८७८ विधवा ० वयापासून ४ वर्षेपावेतो
६४,०४० विधवा ५ वयापासून ९ वर्षापावेतो
८७,२६६ विधवा १० वयापासून १२ वर्षापावेतो

---

१,६५,१८४ विधवा ० वयापासून १२ वर्षांपावेतो

विधवाविवाहाच्या प्रश्नाची चर्चा करताना विधवांचे दोन प्रकार भिन्न पद्धतीने हाताळले पाहिजेत असे लेखकाचे मत आहे. आर्यकाळात व आर्यबौद्धकाळात आपल्याकडे प्राप्तमैथुना विधवांच्या पुनर्विवाहाचा निषेध केला गेला होता. आर्यवंशी जर्मन लोकांमध्येही असा निषेध झाला असल्याचे लेखकाने दाखवून दिले आहे. मात्र अप्राप्तमैथुना विधवांचा विवाह वरील दोन्ही कालखंडांत धर्मसंमत होता व अशा स्त्रियांना पतीच्या धार्मिक कार्यात सहभागी होऊन मोक्षाचा अधिकारही प्राप्त होत असे. थोडक्यात, भारतातील बौद्धधर्माचा उच्छेद करण्यासाठी हिंदुधर्म अधिक कडवा केल्यानंतर प्राप्तमैथुना व अप्राप्तमैथुना हा भेद नष्ट करण्यात येऊन सरसकट सर्वच विधवांच्या विवाहाचा निषेध करण्यात येऊ लागला.[६] सर विल्यम हंटर यांनी आपल्या ग्रंथास 'हिंदू विधवा' असे सामान्य नाव देण्याऐवजी 'हिंदू बालविधवा' असे विशिष्ट नाव देऊन बालविधवांचा ऋतुप्राप्तीच्या सुमारास विवाह करणे जास्त गरजेचे आहे या गोष्टीचा निर्देश केला आहे. १८६९ च्या मार्चमध्ये पुण्याला शंकराचार्यांच्या अध्यक्षतेखाली सुधारक पक्ष व सनातनी पक्ष यांमध्ये नऊ दिवस विधवाविवाहाच्या प्रश्नावर वादविवाद झाला. सुधारक पक्षाचे नेते न्यायमूर्ती माधवराव रानडे होते. तर सनातनी पक्षाचे मार्गदर्शन नारायणाचार्य गजेंद्रगडकरांनी केले. सर्व वयाच्या विधुर पुरुषांना विवाह करता येतो मग समतेच्या तत्त्वानुसार सर्व वयाच्या विधवा स्त्रियांनाही विवाह करण्यासाठी समाजाने मोकळीक ठेवावी अशी जहाल भूमिका सुधारक पक्षाने स्वीकारली होती. प्रस्तुत ग्रंथाच्या लेखकाच्या मते, त्या वेळी सुधारक पक्षाने सौम्य भूमिका घेऊन पूर्वीच्या शास्त्रवचनांप्रमाणे[७], निदान अप्राप्तमैथुना विधवांच्या यथाकाल विवाहास मान्यता द्यावी अशी तडजोड केली असती तर ती सनातन्यांनाही मान्य होण्याची शक्यता होती. जहाल भूमिकेमुळे दोन्ही प्रकारच्या विधवांच्या विवाहाचा निषेध कायम राहिला. या ग्रंथकाराच्या मते प्राप्तमैथुना विधवांना संयम राखणे विधुरांपेक्षा जास्त शक्य असते. या संदर्भात त्यांनी "पुरुष शक्तिहीन झाल्यामुळे कामनिवृत्त होतात पण स्त्रिया केवळ धैर्याने कामास जिंकतात" या अर्थाचे वराहमिहिरांचे वचन उद्‌धृत केले आहे.[८] व्यावहारिक दृष्ट्याही प्राप्तमैथुना विधवांनी स्वतःच्या मुलांसाठी म्हणून विवाह टाळणे योग्य ठरेल असे स्वतःचे मत लेखकाने दिले आहे.

'प्रस्तुत कोणती सुधारणा शक्य आहे' या लेखात लेखकाने बालविवाहाची जागा प्रौढ विवाहाने घेण्यास भारतीय धर्मशास्त्र व सुश्रुत-चरकादिकांचे वैद्यकशास्त्र अनुकूल असल्यामुळे त्या दिशेने सनातनी लोकांचे प्रबोधन करणे शक्य होईल असे म्हटले आहे. बालविवाहाची प्रथा नष्ट पावल्यास 'मूले कुठारः' या न्यायाने बालविधवांची समस्याही उरणार नाही व

---

५. पुस्तकाच्या पृ. ३५१ वर दिलेले हे शातातप स्मृतिवचन खालीलप्रमाणे आहे :
'गौरीं ददन्नाकपृष्ठं। वैकुण्ठं रोहिणीं ददत्। कन्यां ददत् ब्रह्मलोकं। रौखं तु रजस्वलाम्।।

६. 'विधवा पुनर्विवाह निषेध' असे या लेखाचे शीर्षक ग्रंथामध्ये दिले आहे. पण त्यात द्विरुक्तीचा दोष होतो. 'विधवाविवाह-निषेध' असे शीर्षक जास्त उचित वाटते.

७. या संदर्भात लेखकाने दिलेली शास्त्रवचने खालीलप्रमाणे आहेत :
१. वसिष्ठ : 'पाणिग्राहे मृते बाला केवलं मंत्र संस्कृता। सा चेदक्षतयोनिःस्यात् पुनः संस्कारमर्हति।।' पृ. ३८४.
२. शातातप : 'समुद्धृत्य तु तां कन्यां सा चेदक्षतयोनिका। कुलशीलवते दद्यात् इति शातातपोऽब्रवीत्।।' पृ. ३८४.
३. मनु : 'सा चेदक्षत योनिःस्यात् गत प्रत्यागतापि वा। पौनर्भवेन भर्त्रा सा पुनःसंस्कारमर्हति।।' पृ. ३८९.

८. 'तत्राशक्त्या निवर्तन्ते नरा धैर्येण योषितः' वराहमिहिर, पृ. ४४४.

अनुक्रमणिका

स्त्रियांना शिक्षण देऊन त्यांची मते सुधारण्यास अनुकूल करण्यास अवसर मिळेल.

शेवटचा लेख स्त्री-शिक्षणावरचा आहे. त्यात १९०१ सालच्या शिरगणतीचे आकडे देऊन पारशी स्त्रियांच्या तुलनेत मुंबई इलाख्यातील हिंदू स्त्रिया शिक्षणाच्या बाबतीत मागासलेल्या असल्याचे दाखवले आहे.[९] लेखकाच्या मते "स्त्री-शिक्षणाचा प्रसार हिंदू स्त्रियांमध्ये व्हायचा असेल, तर त्यासाठी स्त्री-शिक्षणाची दिशा बदलली पाहिजे. फीमेल हायस्कूल, शारदा सदन या शाळांमधून संसारोपयोगी शिक्षण मिळत नाही. मुलांच्या शाळेत जे विषय शिकविले जातात तेच मुलींच्या शाळेत शिकवणे योग्य नाही" असे या ग्रंथकारांचे मत आहे. या संदर्भात "मिल्लसारखे कट्टर अबलाभिमानी लोक जरी 'स्त्रियांस स्वतंत्रता दिली असता प्रत्येक धंद्यात, प्रत्येक कामात त्या सर्व प्रकारे पुरुषांची बरोबरी करतील' असे म्हणत असले, तरी ज्या स्त्रिया विवाह करून संसारात पडतात त्या कधीही पुरुषांची बरोबरी किंवा पुरुषांचे व्यासंग करू शकत नाहीत. गाई, म्हशी यांजकडूनही बैलांप्रमाणे मेहनतीचे काम करून घेता येईल, परंतु त्यांजकडून मग दूध मिळणार नाही. अश्वजातीत नराप्रमाणेच माद्या काम देतात पण त्या माद्यांस अविवाहित ठेवावे लागते. ज्या स्त्रियांनी आजपर्यंत विद्येत, शास्त्रात किंवा शारीरिक शक्तीत पुरुषांची बरोबरी केली त्या बहुतेक सर्व अविवाहित होत्या असे मला वाटते," असा स्वतःचा अभिप्राय ग्रंथकारांनी प्रकट केला आहे. (पृ. ५४१-५४२) एका अर्थाने यात काही सत्यांश पूर्वीपासून दिसून आलेला आहे. उदाहरणार्थ, ऐतिहासिक काळात अहिल्याबाई होळकर, झाशीची राणी लक्ष्मीबाई यांचे कर्तृत्व त्यांच्या वैधव्यानंतर फुलले. अलीकडच्या काळात बालशिक्षणाच्या पुरस्कर्त्या ताराबाई मोडक यांचे कार्यही नवऱ्याशी त्यांची फारकत झाल्यानंतरच उदयाला आल्याचे दिसून येते. त्यांच्याच प्रेरणेने कोसबाडच्या टेकडीवर कुरणशाळा वगैरे सुरू करून आदिवासी लोकांतील बालशिक्षणाचे कार्य पुढे नेणाऱ्या अनूताई वाघही बालविधवा होत्या. मेधा पाटकरही विभक्त झाल्यावर आपले कर्तृत्व प्रकट करू शकल्या.

परंतु आता काळ बदलत आहे. स्त्रियांना वेगळे शिक्षण देण्याऐवजी स्त्री-पुरुष दोघांनाही संसारोपयोगी व इतर शिक्षण देऊन स्त्रियांना तथाकथित पुरुषी काम करावयास अवसर मिळावा म्हणून पुरुषांनी बायकी कामात सहभाग देणे आवश्यक आहे. 'प्रत्येक यशस्वी पुरुषामागे एक स्त्री असते' असे एक सुप्रसिद्ध वचन आहे. पण प्रत्येक यशस्वी स्त्रीमागे एक पुरुष दिसतो का? सुधारणा या दिशेने व्हायला हवी. एकतर्फी सहकार्य नको; परस्परसहकार्य हवे.

**

---

९. "सन १९०१ ची मनुष्यशिरगणती झाली त्या वेळच्या रिपोर्टात नुसत्या मुंबई इलाख्याचे प्रमाण पाहिले तर ९७ लक्ष हिंदू स्त्रियांत फक्त ५३ हजार शिकलेल्या दाखवल्या आहेत. पारशी स्त्रियांत सुशिक्षित स्त्रियांची संख्या हिंदू लोकांच्या मानाने अधिक आहे. म्हणजे ३८ हजार स्त्रियांत २० हजार स्त्रिया शिकलेल्या नमूद आहेत." पृ. ५३५.








# आधुनिक मराठी ज्ञानसंकलक कोशरचना : स्वरूप व उपयुक्तता (२)

रा.ग. जाधव

## कोशवाङ्मयाची घटकशः उपयुक्तता

ज्ञानविषयांचे संकलन-संपादन करणारे कोश एकविषयसंग्राहक, अनेकविषयसंग्राहक व सर्वविषयसंग्राहक अशा तीन प्रकारचे असतात व मराठीत अशा तीनही प्रकारांच्या कोशरचना आज उपलब्ध आहेत. भिन्न प्रकारच्या अशा कोशांतून काही समान घटक असतात. हे घटक पुढीलप्रमाणे : १. संदर्भग्रंथ (बिब्लिओग्राफी), २. सूची (इंडेक्स), ३. नकाशे, ४. चित्रे, आकृत्या, कोष्टके, तक्ते आणि चित्रपत्रे. यांखेरीज काही कोशांचे स्वतंत्र नकाशासंग्रह खंड – ॲटलास व्हॉल्युम – आणि स्वतंत्र परिभाषासंग्रह असेही घटक असतात. त्याचप्रमाणे कोशातील अनेक नोंदींच्या शेवटी इतर पूरक नोंदींचे निर्देश दिलेले असतात. शिवाय एखाद्या नोंदीच्या मजकुरात काही इतर परिपोषक नोंदविषयांचे नेमके नामनिर्देश आलेले असतात व ते वाणांकन करून वा तिरप्या टंकांत देऊन वाचकाचे लक्ष त्यांकडे वेधलेले असतात.

या सर्व पूरक घटकांची जिज्ञासू कोशवाचकांच्या दृष्टीने मोठीच उपयुक्तता असते. या संदर्भातील काही बाबी वाचकांच्या, विशेषतः मराठी कोशवाचकांच्या निदर्शनास आणून देणे इष्ट ठरेल.

### १. सूची (इंडेक्स)

*महाराष्ट्रीय ज्ञानकोश*कर्ते डॉ. केतकर यांनी सूचीची उपयोगिता स्पष्ट करताना म्हटले आहे : "एक तर भाषाविकासाचे अवलोकन या सूचीच्या साहाय्याने होईल. अनेक शास्त्रीय शब्द सूचिकृत झाले असल्यामुळे शास्त्रीय शब्दसंग्राहकास सूचीचा उपयोग होईल." (*महाराष्ट्रीय ज्ञानकोश*, विभाग २२, प्रस्तावना)

विषयसंग्राहक कोशातील सूची हा एक प्रकारचा अनन्यसाधारण शब्दकोशच असतो. कोशाच्या विषयानुसार या सूचिरूप शब्दकोशाचे स्वरूप ठरते. मराठीतील *समाजविज्ञान कोशा*च्या (६ खंड) खंडवार सूचींमधून समाजविज्ञानातील संकल्पना, कल्पना, विचार, विचारप्रणाली, सामाजिक संस्था व संघटना इत्यादींची मराठी परिभाषाच संग्रहित केल्याचे आढळून येईल. *महाराष्ट्रीय ज्ञानकोश* व *मराठी विश्वकोश* या सर्वविषयसंग्राहक कोशांच्या सूची या तर मराठीतील अव्वल दर्जाचे भाषिक व पारिभाषिक शब्दकोश ठरतील. या सूचिरूप शब्दसंग्रहावरून केवळ नजर फिरवणे हेदेखील कोशवाचकाला शब्दज्ञानाचा मोठाच लाभ घडवून देईल. जिज्ञासू वाचकाची ज्ञानलालसा नाना दिशांनी चाळवून तिला पुढील साधनेला प्रवृत्त करण्याची किमया सूचीचा घटक करू शकतो. सूचीचा हेतू वाचकाला हव्या त्या विषयाची नोंद कोठे आहे हे सांगण्यासाठी असतो हे खरेच; पण अनेकदा वाचकाला मनोमन हव्या असणाऱ्या पण नेमकेपणाने माहीत नसलेल्या विषयांची आकस्मिक पण सुखद भेटही सूची घडवून आणू शकते. जिज्ञासाजागृतीचे महत्त्वाचे कार्य सूचीच्या स्वतंत्रपणे केलेल्या परिशीलनातून घडू शकते. अंधुक जिज्ञासेला डोळस करण्याचे व तिला हवे ते दाखवण्याचे काम सूची करू शकते. मराठीत *जैन ज्ञानकोश* (४ खंड) आहे. जैन धर्म, तत्त्वज्ञान व संस्कृती यांची मराठी भाषा व परिभाषा या कोशाच्या सूचीतून वाचकास परिचित होईल. *भारतीय संस्कृति कोशाच्या* (१० खंड) सूचीतून भारतीय सांस्कृतिक जीवनाची शेकडो अंगोपांगे मराठी भाषेतून ज्ञात होतील. म्हणूनच डॉ. केतकर म्हणतात त्याप्रमाणे सूचीमधून मराठी भाषाविकासाचे अवलोकन करता येईल आणि विविध प्रकारांतील शास्त्रीय व तांत्रिक परिभाषा उपलब्ध होईल.

डॉ. केतकरांनी सूचिरचनेसाठी दोन लक्ष 'चिठ्ठ्या' (म्हणजे नोंदी) तयार केल्या होत्या. याचा अर्थ ही सूची म्हणजे दोन लक्ष मराठी शब्दांचा संग्रह आहे.

सूचीचा आणखी एक उपयोग डॉ. केतकरांनी नमूद केला आहे : "ज्ञानकोशातील लेखांत जर परस्परविरुद्ध किंवा असंगती असेल, तर या सूचीमुळे तीही लक्षात येऊन त्या लेखविषयावर विशेष विचार किंवा नवीन संशोधन याला प्रेरणा होईल." (महाराष्ट्रीय ज्ञानकोश, विभाग २२, प्रस्तावना)

अनुक्रमणिका

प्रत्येक माहितीपर कोशातील सूचिप्रक्रिया ही एक प्रकारची त्यातील गुन्हा-अन्वेषण-यंत्रणा म्हणता येईल. कोशामधील माहितीमध्ये विसंगती, विरोध, पुनरुक्ती, संदिग्धता, दूरान्वय, त्रुटितता, तपशिलातील चुका यांसारखे 'गुन्हे' सूचिप्रक्रियेत बरोबर टिपले जातात. सूची हे एक प्रकारे कोशसाहित्याचे लेखापरीक्षण – ऑडिट – ठरते. अर्थात सूचीचा या प्रकारचा डिटेक्टिव्ह उपयोग कोशवाचकांपेक्षा कोशकर्त्यांनाच अधिक आहे, हे उघड आहे. कोशवाचकांनी मात्र याही दृष्टीने सूचीकडे पाहणे व लक्षात आलेल्या विसंगती कोशकर्त्यांच्या नजरेस आणून देणे अपेक्षित आहे. वाचकांच्या हिताशी ही अपेक्षा निगडित आहे.

माहितीपर कोशांची सूचिरचना ही अत्यंत अवघड गोष्ट आहे व आदर्श सूची ही बाब आकाशपुष्पाइतकीच दुर्मिळ ठरते. डॉ. केतकरांनी सूचिरचनेतील व्यक्तिगत आवडीनिवडीचा उल्लेख करून एक मर्यादा दाखवून दिली आहे. विशेषतः अनेकविषयसंग्राहक आणि सर्वविषयसंग्राहक कोशांच्या बाबतीत सूचिकार्य हे मोठेच आव्हान ठरते. त्या त्या कोशाचा समग्र विषयपरिसर एकाच वेळी डोक्यात ठेवूनच सावध एकाग्रचित्ताने सूचिरचना करावी लागते. यावर एक तोडगा म्हणजे खंडशः सूची करत राहणे व तपासत जाणे हा आहे. तरीही सर्व खंडांच्या अशा स्वतंत्रपणे केलेल्या सूच्या पुन्हा संकलित-संपादित करणे टाळता येत नाही व या टप्प्यावर अनेक प्रश्न निर्माण होत राहतात.

या अडचणी लक्षात घेऊनही माहितीपर कोशातील सूचीचा घटक स्वतंत्रपणे वाचनीय, मननीय व उद्बोधक ठरतो, हे कोशवाचकाने विसरता कामा नये.

## २. संदर्भग्रंथ (बिब्लिओग्राफी)

ज्ञानसंकलक कोशांचा संदर्भग्रंथ हा घटकही स्वतंत्रपणे उपयुक्त ठरणारा आहे. मराठी कोशवाङ्मयात संदर्भग्रंथ दोन पद्धतींनी दिले जातात : एक प्रकार म्हणजे कोशरचनेसाठी वापरलेल्या सर्व संदर्भग्रंथांची यादी खंडशः किंवा खंडारंभी किंवा खंडसमाप्तीनंतर देणे. *भारतीय संस्कृति कोशा*त समग्र संदर्भ-ग्रंथांची यादी प्रारंभीच दिलेली आहे. त्रिखंडात्मक *भारतवर्षीय चरित्रकोशा*तही हीच पद्धत स्वीकारलेली आहे. *जैन ज्ञानकोश* किंवा तत्सम धार्मिक कोश यांतूनही संदर्भग्रंथाची यादी दिलेली आढळते. (*जैन ज्ञानकोशा*त यासाठी 'संकेतसूची' असा शब्द योजिलेला आहे.) *मराठी तत्त्वज्ञान महाकोश* तसेच *मराठी विश्वकोश* यांत प्रत्येक नोंदीच्या शेवटी संदर्भग्रंथ दिलेले आहेत.

कोशरचनेत संदर्भग्रंथ कोणत्याही पद्धतीने दिलेले असले, तरी जिज्ञासू वाचकाला त्यांचे स्वतंत्रपणे केलेले अवलोकन उद्बोधक व मार्गदर्शक ठरणारे आहे. कोशातील जो विषय वा नोंद आपण वाचतो, त्या विषयाची उगमस्थळे संदर्भग्रंथांवरून लक्षात येतात. त्या विषयाची ठळक वैशिष्ट्ये वा प्रतिमा पुष्कळदा संदर्भग्रंथांच्या शीर्षकांतूनही आढळतात व आपल्या इष्ट विषयाचा आगळाच बोध आपणास होऊन जातो. संदर्भ ग्रंथांचे लेखक, प्रकाशक, प्रकाशनस्थळे व प्रकाशनवर्षे यांसारखे तपशीलही कुतूहलजनक व उद्बोधक ठरतात. अभिजात भारतीय ग्रंथ परदेशात कुठे, कधी व कोणी संपादित, भाषांतरित केले, हे समजणेदेखील थरारक संतोष देते. संदर्भग्रंथावरून त्या त्या विषयाची ज्ञानक्षेत्रातील वाटचालही लक्षात येते. एखाद्या विषयाखालील संदर्भग्रंथ अगदी अद्ययावत असतात, कालपरवापर्यंत प्रकाशित झालेले असतात. यावरून त्या विषयाची प्रगतिशील अन्वर्थकता व उपयोगिताच सूचित होते. काही नोंदींखालील संदर्भग्रंथ खूप पूर्वीच थांबलेले असतात. ते तिथेच का थांबावेत, असा एक बौद्धिक चाळा करण्यास वाचकाचे मन प्रवृत्त होते. कदाचित एखादा अभ्यासू कोशवाचक या वस्तुस्थितीचा मागोवा घेण्यास व ह्यातून त्या मागे पडलेल्या विषयाचा नव्याने पुनरुद्धार करण्यासही उद्युक्त होण्याची शक्यता असते. ज्ञानविज्ञानातील अनेक नवप्रवर्तक शोध व अभ्यास अशाच प्रकारच्या अपघाती प्रेरणेतून निर्माण झाल्याचे दिसून येईल.

आपणास इष्ट वाटणाऱ्या ज्ञानविषयांचा प्रगत अभ्यास करण्यास संदर्भग्रंथ मार्गदर्शक ठरतातच, पण त्यांचे बारकाईने केलेले निरीक्षण हेदेखील कोशवाचकाला विविध प्रकारे ज्ञानोत्सुक करू शकते. कोशवाङ्मयाशी विविध नात्यांनी व पातळ्यांवर वाचकाला संबंध राखता येणे शक्य आहे, हे लक्षात घेतल्यास केवळ गंभीर चेहऱ्याचा कोशवाचक ही प्रतिमा पुसून टाकता येईल. कोशवाचन हा एक आनंददायक व उद्बोधक अनुभव ठरू शकेल.

एका ज्ञानकोशाने दुसऱ्या ज्ञानकोशाचा अंतर्भाव आपल्या नोंदीखालील संदर्भग्रंथात करू नये, असा एक संकेत आहे. यास दोन अपवाद आहेत. एक म्हणजे एखाद्या ज्ञानकोशात

पुष्कळदा सर्वच संदर्भग्रंथांची यादी प्रारंभी व शेवटी दिलेली असते. त्यात इतर ज्ञानकोशांचा समावेश विकल्पाने करणे रूढ आहे. दुसरे म्हणजे एकाच विषयावरील सर्वमान्य व प्रमाणभूत अशा बृहत् ज्ञानकोशांचा संदर्भ एखाद्या नोंदीखालील संदर्भग्रंथात देता येतो. इस्लामधर्मावरील बृहत्कोश वा तत्सम कोश हे तारतम्याने संदर्भार्थ वापरले जातात.

**३) कोष्टके, तक्ते, सारण्या, आकृत्या, चित्रे व चित्रपत्रे**

एक, अनेक किंवा सर्व ज्ञानविषयांना वाहिलेल्या कोशांच्या बाबतीत एक रचनासंकेत सर्वांच्या मूकसंमतीने रूढ झालेला आहे. हा संकेत म्हणजे अशा कोशांतील प्रत्येक पान चित्र, आकृती, रेखाटन यांसारख्या बाबींनी सजलेले असावे, ते सचित्र असावे; त्यावर वाचनीयाबरोबरच थोडेसे प्रेक्षणीयही काहीतरी असावे, दरएक पान एक आखीवरेखीव आकृतिबंध दिसावे. कोशीय पान केवळ शब्दांनी व परिच्छेदांनी गच्च भरलेला भाषिक आकृतिबंध नसावा; कारण अशा शब्दाळ पृष्ठाचे दर्शन विलक्षण जाचक व अपकर्षक ठरते. हा संकेत कमीअधिक प्रमाणात बहुतेक कोशवाङ्मयातून पाळला जातो. मराठीतील *भारतीय संस्कृति कोश*, *मराठी विश्वकोश* यांसारख्या कोशांतून याची चांगली प्रचिती येते. *भारतीय समाजविज्ञान कोश* मात्र या बाबतीत निराशा करणारा आहे.

ज्ञानबोधाबरोबरच चित्रबोध करणे हेही कोशवाङ्मयाचे एक सर्वसाधारण उद्दिष्ट असतेच. मराठी समाजात चित्रदृष्टी पुरेशी सार्वत्रिक नाही; ती अल्पसंख्याकांपुरतीच सीमित आहे. व्यंकटेश माडगूळकरांचा एक विलक्षण चपखल शब्दप्रयोग वापरून म्हणावयाचे तर बहुसंख्य मराठी समाज हा दृश्य-निरक्षरच (Visually illiterate) आहे. त्यामुळे तर कोश-वाङ्मयातील सचित्रतेचा घटक विशेषच आस्थेने मराठी कोशवाचकाने लक्षात घेणे आवश्यक ठरते.

जिज्ञासावृत्ती ही सार्वत्रिक असते हे खरेच; पण ती बहुरंगी व बहुपदरी असते हेही खरे आहे. कोशवाङ्मय म्हणजे केवळ भाषारूपात जिज्ञासापूर्ती करून घेण्याचे साधन नाही; तर ते चित्ररूपातही कुतूहलपूर्ती करणारे साधन आहे, हे कोशवाचकाने लक्षात घेणे उपयुक्त ठरेल. कोशवाङ्मयातील चित्ररूप हेदेखील अनेकरंगी असते. कोष्टके, तक्ते, सारण्या, आकृत्या यांची मांडणी लक्षवेधक असते. ही लक्षवेधकता अनेक घटकांतून साधलेली असते. पानाच्या अवकाशात उभ्याआडव्या रेषांनी, लहानमोठ्या टंकांनी, भौमितिक आकारांनी एका प्रमाणबद्ध स्वरूपात कोष्टकादी घटक सादर केलेले असतात. यांत्रिक, तांत्रिक आकृत्यांना त्यांचा स्वतःचा एक जैविक व म्हणून कलात्मक घाट लाभलेला असतो. यंत्र वा तंत्र ही एक एकात्म रचना असते. एकात्मता ही नेहमीच एक सौंदर्यघटक समजण्यात येते. कोशवाङ्मयातील सचित्रतेचे हे घटक म्हणूनच स्वतंत्रपणे न्याहाळणे मोठे आनंददायक व अर्थपूर्ण ठरते.

प्रकाशचित्रे, रेखाचित्रे, रंगीत चित्रे, रंगीत व साधी चित्रपत्रे ही कोशवाङ्मयाची एक देखणी बाजू होय. प्राचीन, परंपरागत अशा देशी-विदेशी कलाकृतींचे निवडक दर्शन कोशवाङ्मय वाचकांस घडवत असते. तसेच मनुष्यजीवनाच्या व संस्कृतीच्या अनेकविध नमुन्यांची आरासही कमीअधिक प्रमाणात त्यातून मांडलेली असते. ही देखणी, चित्रमय बाजू कलेच्या अंगाने समजून घेणेही आनंददायी ठरते. पाहण्याची जिज्ञासा वाढवली की, जे पाहिले त्याची कलात्मकता जाणून घेण्याचे कुतूहलही वाढू शकते. यासाठी खूप पाहण्याचा प्रयत्न असला पाहिजे. कोशवाङ्मय हे जसे वाचण्यासाठी आहे, तसेच ते पाहण्यासाठी आहे, हे कोशजिज्ञासूने विसरता कामा नये.

*भारतीय संस्कृति कोशा*तील रेखाटने, *मराठी विश्वकोशा*-तील चित्रे व चित्रपत्रे यांतून कोशवाचकाला आपली दृश्यनिरक्षरता हळूहळू दूर करता येईल. नकाशे पाहणे हादेखील एक आगळावेगळा भूगोलानंद आहे. स्थळांचे नेमके ज्ञान व भान हे ज्ञानग्रहणात अत्यंत उपयुक्त ठरते. पानपतच्या तिसऱ्या युद्धाचे विवेचन कोशातून वाचत असताना डोळ्यांसमोर पानपत त्याच्या भौगोलिक स्थानात येणे अधिक उद्बोधक व चित्त-थरारकही ठरते. कोशवाङ्मयातील नकाशे व नकाशासंग्रह खंड म्हणूनच एक परिशीलनाचा घटक आहे. स्थळाच्या भौगोलिक ज्ञानाखेरीज अनेक ज्ञानविषय अंशतः पांगळे ठरतात. *विश्वकोशा*त महाराष्ट्रातील सर्व जिल्ह्यांचे व प्रांतांचे (घटक-राज्यांचे) नकाशे दिलेले आहेत. तसेच पृथ्वीवरील खंडांचे व देशांचेही राजकीय व प्राकृतिक नकाशे त्यात आहेत. हे नकाशा-दालन हा स्वतंत्रपणे अवलोकनाचा व आस्वादाचा प्रांत होय. *भारतवर्षीय चरित्रकोशा*च्या पहिल्या खंडात (प्राचीन काळ) भारतीय युद्धकालीन भारताचा नकाशा दिलेला आहे. तो पाहणे किती मनोरंजक व उद्बोधक वाटते!



**४) परिभाषा**

कोशवाङ्मयाच्या पारिभाषिक घटकाकडे आद्य मराठी ज्ञान-कोशकारांनी वाचकांचे लक्ष वेधले होते. ज्ञानविज्ञाने संकलित करणाऱ्या आधुनिक कोशकारांपुढे तर हा प्रश्न प्रारंभापासून होता व आजही तो अंशतः टिकून राहिलेला आहे. लेखक व वाचक या दोहोंच्या पुढे हा प्रश्न सतत उद्भवतो. या परिभाषेच्या प्रश्नाचे स्वरूप दुहेरी आहे : एक म्हणजे प्रत्येक ज्ञानशाखेची विवेचनाची भाषिक धाटणी वेगळी व वैशिष्ट्यपूर्ण असते. देशाच्या अर्थसंकल्पाचे विवरण भूविज्ञानाच्या भाषिक मोडणीत करता येत नाही आणि कायद्यातील विषय साहित्यसमीक्षेच्या भाषाशैलीत मांडता येत नाही. मराठी भाषेची ही ज्ञानविज्ञान-विशिष्ट परिभाषा कोशकारांनी व लेखकांनी प्रयत्नपूर्वक घडविण्याचा उपक्रम पूर्वीच सुरू केला आहे. दुसरे म्हणजे तांत्रिक किंवा शास्त्रीय संज्ञा. मराठीतील विविध ज्ञानविज्ञानांच्या शास्त्रीय संज्ञा घडविण्याचा प्रश्न. ज्ञानकोशकारांपासून विश्व-कोशकारांपर्यंत, त्याचप्रमाणे समाजविज्ञाने, तत्त्वज्ञान, भारतीय संस्कृती यांवरील कोशकारांपर्यंत सर्वांनीच मराठी परिभाषेचे हे दुहेरी कार्य आपापल्या परीने पार पाडण्याचा प्रयत्न केलेला आहे. *मराठी विश्वकोशाने* तर 'परिभाषा-संग्रह' असा एक पुरवणी खंडच आधी प्रकाशित करून त्यातून शेकडो इंग्रजी शास्त्रीय संज्ञांचे मराठी पर्याय दिलेले आहेत.

नव्याजुन्या व देशीविदेशी ज्ञानविषयांची नेमकी परिभाषा मराठी कोशकारांनी कशा रीतीने घडवीत आणली, हा खरे तर स्वतंत्र संशोधनाचा एक अर्थपूर्ण विषय आहे.

मराठी कोशवाचकांचे या घटकाकडे लक्ष वेधणे आवश्यक आहे. आपल्या भाषिक व्यवहाराचे क्षेत्र विस्तारत चालले आहे आणि त्यात फार मोठी विविधता प्रत्यही वाढत जाताना दिसत आहे. हा भाषिक व्यवहार अधिकाधिक काटेकोरही होत आहे. मराठी कोशवाङ्मयाने या नव्या प्रगत व व्यामिश्र भाषासृष्टीला नेमकेपणा, शास्त्रीयता व लवचीकता देण्याचा प्रयत्न जारी राखला आहे.

*विश्वकोश*, *समाजविज्ञानकोश*, *तत्त्वज्ञान महाकोश*, *भारतीय संस्कृतिकोश* इत्यादींतील पाने चाळत गेलो, तर मराठी गद्याच्या पारिभाषिक स्वरूपाची व सामर्थ्याची प्रचिती आल्याखेरीज राहणार नाही. मराठी भाषेच्या साहसी मोहिमा असेच त्याचे वर्णन करावे लागेल. संगणकशास्त्र मराठी भाषा कशी छानपणे समजावून सांगते, कलनाची (कॅल्क्युलस) कला कशी स्पष्ट करते, भौतिकीमधील गणिती प्रमेये कशी उलगडून दाखवते, सौंदर्यशास्त्राची मीमांसा कशी करते आणि परिस्थिति-विज्ञानाची (इकॉलॉजी) मौलिकता कशी पटवून देते, हे कोशवाङ्मयातून पाहणे म्हणजे एक अपूर्व व थरारक भाषानंद आहे. मराठी कोशवाचकाला ज्ञानबोधाबरोबरच आधुनिक जीवनाचा भाषाबोध व भाषानंद देण्याचे उपयुक्त काम मराठी कोशवाङ्मय करीत आहे, हे आवर्जून लक्षात घेतले पाहिजे.

ज्ञानसंकलक कोशवाङ्मयाची घटकशः संभवणारी उपयुक्तता येथवर थोडक्यात दिग्दर्शित करण्याचा प्रयत्न केला. खरे तर हा विषय अगदी उघड आहे व तो बहुतेक वाचकांनाही आधीच माहीत आहे. यात नवीन असे काही सांगण्याचा आव नाही. जे परिचित आहे, तेच इथे पुन्हा सांगितले आहे. तथापि अनेकदा अगदी उघड व स्पष्ट गोष्टीही पुन्हा निदर्शनास आणून देणे आवश्यक ठरते. परिचित गोष्टींचे परिप्रेक्ष्य थोडेफार उजळ करून दाखवावे लागते. दुसरे म्हणजे ज्ञानक्षेत्रातील नव्या नव्या उपक्रमांना प्रतिसाद देणाऱ्या अभिरुचीचे संवर्धन करण्याचीही प्रारंभकाळात गरज असते. आधुनिक मराठी विषयसंग्राहक कोशवाङ्मयाचे वय अवघे पन्नाशी-साठीचे! आपल्या शैक्षणिक व सांस्कृतिक जीवनाशी अद्यापिही हे कोशवाङ्मय पुरेसे एकजीव झालेले नाही. त्याचे अस्तित्व व उपयुक्तता यांविषयी अनेक समज व गैरसमजही प्रचलित आहेत. या ऐतिहासिक संदर्भात कोशवाङ्मयाची नाना उपयुक्त अंगे पुनरावृत्तीचा दोष पत्करूनही वाचकांपुढे स्पष्ट करीत जाणे गरजेचे ठरते. या घटकशः उपयोगितेच्या विवेचनाकडे याही पार्श्वभूमीवर वाचकांनी पाहावे एवढेच.

## कोशवाङ्मयाची उपयुक्तता : तौलनिक अभ्यास

मराठी कोशवाङ्मयातील काही विषय किंवा नोंदी यांची उपयुक्तता तौलनिक दृष्टीने न्याहाळून पाहावी, या कुतूहलाच्या पोटी हा प्रयत्न मी करीत आहे. कोणताही नोंदविषय विविध प्रकारे मांडता येतो, हे खरेच; तथापि प्रत्येक कोशाची भूमिका किंवा उद्दिष्ट त्याचप्रमाणे विवेचनाचे धोरण किंवा दिशा या गोष्टी पूर्वनिश्चित असतात. वाचकांनाही या गोष्टी परिचित असतात किंवा असाव्यात. कोशविशिष्ट मर्यादितदेखील एकच विषय निरनिराळ्या कोशांतून कसा मांडला जातो व वाचकाच्या स्पष्ट व अस्पष्ट गरजा कशा भागतात वा भागत नाहीत हे पाहणे उद्बोधक ठरते.

अनुक्रमणिका








कृष्ण, शिवाजी, क्रांती, म. गांधी व गांधीवाद व भगवद्गीता हे पाच नोंदविषय यासाठी सहजपणे मी निवडले आहेत. त्यांचे निवडक कोशवार तपशील व त्यासंबंधीची स्थूल स्वरूपाची निरीक्षणे खाली देत आहे :

### १. कृष्ण

अ) *भारतीय संस्कृति कोश* : खंड २ : पृष्ठे ४६७ ते ४९१; एकूण शब्दसंख्या सु. १५०००

आ) *मराठी विश्वकोश* : खंड ४ : पृष्ठे १९९ ते २०४; एकूण शब्दसंख्या सु. ३६००

कृष्ण ही नोंद शब्दसंख्येच्या दृष्टीने पाहता *भारतीय संस्कृतिकोशा*त *विश्वकोशा*तील नोंदीच्या तुलनेने जवळजवळ चौपट मोठी आहे. कृष्णाचे भारतीय संस्कृतीच्या दृष्टीने असलेले महत्त्व लक्षात घेता आणि *विश्वकोशा*ची सर्वविषयसंग्राहकता विचारात घेता प्रथमदर्शनी तरी शब्दसंख्येचे हे तौलनिक प्रमाण योग्य वाटते.

*संस्कृति कोशा*तील विवेचन कृष्णाच्या वक्ता, तत्त्वज्ञ, आदर्श पुरुष, राजकारणी, तंत्रेश्वरता यांसारख्या विविध भूमिका संदर्भग्रंथांच्या निर्देशांसह स्पष्ट करते. 'काव्यविषय कृष्ण' यासारखे त्यातील विवेचन तसेच कृष्णयंत्राची माहिती कोशाच्या उद्दिष्टाशी सुसंगत ठरते. तथापि या नोंदीत कृष्णाचे देवतारूप किंवा अवतारी स्वरूप काहीसे नकळतपणे गृहीत धरल्याचे जाणवते. प्राचीन पौराणिक संदर्भग्रंथांधारे ही नोंद तयार केल्याने त्या संदर्भग्रंथांमागील प्राचीन धर्मप्रधान व श्रद्धाप्रधान युगाच्या प्रेरणाही या नोंदीत प्रेरक ठरल्याचे जाणवते. परंपरेने जाणलेला कृष्ण असे या विवेचनाचे फलित ठरते. त्यामुळे विद्यमान काळातील वेगळ्या व आधुनिकतावादी सांस्कृतिक पर्यावरणात वावरणाऱ्या वाचकाला तो परंपरापुनित कृष्ण व्यवस्थित समजला, तरी त्या विभूतीची आजउद्याशी संभवणारी नाती या नोंदीतून उलगडत नाहीत.

*मराठी विश्वकोशा*तील कृष्णावरील नोंद ही मुख्यतः तो एक वास्तविक पण असामान्य कर्तृत्ववान व्यक्ती या भूमिकेतून लिहिलेली आहे. मोजक्या व मूलभूत प्राचीन संदर्भग्रंथांचा निर्देश तेवढा करून कृष्णचरित्र सलगपणे मांडून दाखविले आहे. या चरित्रकथनात घटना वर्णन करताना गौण-प्रधान विवेक राखलेला आहे. आणि काटेकोर माहितीपर असूनही या नोंदीतील प्रतिपादन बरेचसे चिकित्सकही झालेले आहे. कृष्णाची माहिती व मूल्य या दोन्ही गोष्टी प्राप्त झाल्याचे एक पुरे-अपुरे पण समाधान वाचकाला लाभते. कृष्णचरित्रातील चमत्कारांसंबंधीही एक चिकित्सक आधुनिक मिथकदृष्टी या नोंदीतून जाणवते. चमत्कारांचा वास्तव अर्थ सूचित करण्याचा प्रयत्न दिसतो. कृष्णाने पूतनावध केला, याचा वास्तव अर्थ पूतना नामक बालरोगापासून त्याने सुटका करून घेतली वा त्याची सुटका झाली अशी मीमांसा या नोंदीत आढळते. सर्वविषयसंग्राहक कोशाच्या स्वाभाविक शब्दमर्यादेत ही नोंद कृष्णाची एक वेधक व अर्थपूर्ण प्रतिमा वाचकमनात उभी करू शकते.

मजकुराबरोबरची चित्रे व रेखाटने यांचे प्राचुर्य *संस्कृति-कोशा*त आहे व त्यात प्राचीन चित्रादी साहित्याचा आधार घेतल्याने ती वेधक व सूचकही ठरतात. उलट, *विश्वकोशा*त मजकुराबरोबर मोजकीच चित्रे असून स्वतंत्र चित्रपत्रांतून मात्र कृष्णप्रतिमेची विविध पूर्वापार रूपे पाहावयास मिळतात. तीही वेधक व अभ्यसनीय आहेत.

मात्र एकात्म, एकसंध व प्रवाही विवेचनाचा लाभ *विश्वकोशा*ची नोंद करून देते, तर *संस्कृति कोशा*तील नोंद काहीशी विस्कळीत व अधिकच लांबलेली व म्हणून अंशतः पाल्हाळिक वाटते.

*विश्वकोशा*त कृष्ण ही नोंद एक ज्ञानविषय बनते, तर *संस्कृतिकोशा*त ती एक माहिती-विषय ठरते. अर्थात हा अभिप्राय तारतम्याने घेणे व त्यातील व्यक्तिगततेचा अंशही लक्षात ठेवणे आवश्यक आहे.

### २. भगवद्गीता

अ) *महाराष्ट्रीय ज्ञानकोश* : विभाग १२ : पृष्ठे १२६ ते १३१, एकूण शब्दसंख्या सु. ३६००

आ) *मराठी तत्त्वज्ञान महाकोश* : १) खंड २ : पृष्ठे ३८९ ते ३९३, एकूण शब्दसंख्या सु. २९००
भगवद्गीता विवरणे (उपविषय) २) खंड २ : पृष्ठे ३९४ ते ३९७, एकूण शब्दसंख्या सु. २२००

इ) *मराठी विश्वकोश* : खंड १२ : पृष्ठे १२ ते १४, एकूण शब्दसंख्या सु. १६००

भगवद्गीता हा अध्यात्मशास्त्रातील एक महान ग्रंथ; त्यामुळे वरीलप्रमाणे *तत्त्वज्ञान महाकोशा*त त्यास पाच हजारांहून अधिक शब्दांचा अवसर देणे उचितच ठरते. *ज्ञानकोश* व







अनुक्रमणिका

*विश्वकोश* हे दोन्ही कोश सर्वसंग्राहक; तरीही ज्ञानकोशात या नोंदीस विस्तृत जागा (म्हणजे ३६०० शब्द) दिलेली आहे. *विश्वकोशा*तील ही नोंद मात्र कोशप्रकृतीशी सुसंगत ठरणारी आहे.

*ज्ञानकोशा*तील नोंद ही मुख्यतः संशोधनाच्या अंगावर भर देऊन लिहिल्याने व या बाबतीत ती अद्ययावत राखण्याच्या उत्साहामुळे स्वाभाविकपणेच लांबलेली आहे. भगवद्गीतेची कलकत्ता येथील पहिली छपाई (१८०९), नंतरच्या विविध आवृत्त्या व भाषांतरे, तिच्यातील प्रसंग व उपदेश, गीताकाल-निर्णय, भाष्यग्रंथ अशा मुद्द्यांच्या अनुरोधाने ही नोंद लिहिलेली आहे. ही सर्वच माहिती संशोधनप्रधान आहे, तत्त्वज्ञानप्रवण नाही. कदाचित ही हाताळणी त्या काळाच्या दृष्टीने योग्य व समर्पक ठरणारी असावी असेही जाणवते.

*तत्त्वज्ञान महाकोशा*तील नोंद भगवद्गीता व भगवद्गीता विवरणे अशा दोन भागांतून केलेली आढळते. ही नोंद तत्त्वज्ञानाच्या सर्वमान्य परिभाषेत हाताळलेली आहे. धर्मशास्त्र, ज्ञानशास्त्र, सत्ताशास्त्र, नीतिशास्त्र इत्यादींतील संकल्पना व विचार यांच्या चौकटीत केलेले हे निखळ तत्त्वप्रतिपादन आहे. आधुनिक तत्त्वज्ञानविवेचनाची पद्धत, भाषा व परिभाषा हे या नोंदीचे कोशसुसंगत असे वैशिष्ट्य होय.

या नोंदीचे वैशिष्ट्य म्हणजे तिच्या शेवटी दिलेल्या संदर्भग्रंथांत एकही इंग्रजी ग्रंथ नाही. ही बाब मोठी अर्थपूर्ण आहे.

भगवद्गीता विवरणे या दुसऱ्या भागात गीतेवरील भाष्ये व भाष्यकार यांची मीमांसापूर्ण माहिती संक्षेपाने दिलेली आहे. त्यात केवलाद्वैती विवरणापासून लो. टिळक, म. गांधी, डॉ. राधाकृष्णन्, डॉ. भांडारकर यांच्यापर्यंतचे भाष्यकार व भाष्ये समाविष्ट आहेत. विशेष म्हणजे साक्षात्कारी विवरणे या उपशीर्षकाखाली रुडॉल्फ ऑटो, अरविंद घोष, रा.द. रानडे, संत ज्ञानेश्वर यांच्या साक्षात्कारी मीमांसेचा परिचय करून दिलेला आहे.

ऐतिहासिकता व संशोधन या अंगांनी लिहिलेल्या *ज्ञानकोशा*तील नोंदीला तत्त्वज्ञानाच्या अंगाने एक परिपूर्णता देण्याचा प्रयत्न तत्त्वज्ञानाच्या महाकोशकारांनी केलेला आहे. वाचकांना मात्र परस्परपूरक अशा या दोन्ही नोंदी जिज्ञासेपोटी वा अभ्यासासाठी वाचणे क्रमप्राप्त ठरेल.

*विश्वकोशा*तील भगवद्गीता ही नोंद माहितीपर, उद्बोधक व आटोपशीर आहे. इतिहास व तत्त्वज्ञान अशा दोहोंच्या दृष्टीने गीतेचा आशय व महत्त्व या नोंदीत सुबोध भाषेत स्पष्ट केलेला आहे. सामान्य वाचकाला व जिज्ञासूला गीतेचा सर्वांगीण पण सारभूत व संक्षिप्त स्वरूपात परिचय ही नोंद करून देते. गीता हा एक व्यामिश्र, संदर्भबहुल व अनेकार्थक आविष्कार आहे. हे गीतही आहे, दर्शनही आहे; कलाही आणि अध्यात्मही आहे. सर्वसंग्राहक कोशात या प्रकारचा विषय नियत शब्दमर्यादेत समाधानकारकपणे हाताळणे सोपे नसते. यासाठी अशा विषयाचा एक लेखनपूर्व समग्रलक्षी साक्षात्कार लेखकाला घडणे आवश्यक असते. अशा प्रकारचा साक्षात्कार म्हणजे त्या विषयाच्या एकात्म संघटनेचा साक्षात्कार होय. हा त्या ज्ञानविषयाचा आकारिक चिद्भास असतो, आणि त्यात त्या ज्ञानविषयाचे साकलिक रूप व त्यातील घटक – म्हणजे whole and parts – याचे एक सुविहित रूप प्रतीत होते. लेखनपूर्व अशा या प्रतीतीमधूनच एक सलग, स्वयंपूर्ण व पर्याप्त असे लेखन निर्माण होते. *विश्वकोशा*तील भगवद्गीता ही नोंद या प्रकारची आहे. चिकित्सक वाचकाला तिच्यात कदाचित काही उणिवा, अपूर्णता, एकांगीपणा जाणवला, तरी एखाद्या स्वयंपूर्ण कलाकृतीप्रमाणे ही नोंद एक अर्थपूर्ण सुसंगत विवेचनाचे परिणामकारक चित्र मनावर ठसवते व सर्वसंग्राहक कोशवाचकाला अशा चित्रप्रतीतीचीच गरज असते.

## ३. क्रांती

अ) *भारतीय समाजविज्ञान कोश* : खंड २

१) क्रांती - १ : पृष्ठे २२५ ते २४२, सु. ९९०० शब्द;

२) क्रांती - २ : पृष्ठे २४३ ते २५४, सु. ६८०० शब्द;

३) क्रांती व प्रतिक्रांती : पृष्ठे २५४ ते २५६, सु. १७०० शब्द.

आ) *मराठी विश्वकोश* : खंड ४ : पृष्ठे ४४२ ते ४४६, सुमारे ३७०० शब्द.

क्रांती हा समाजविज्ञानातील तसेच इतिहासातील एक महत्त्वाचा व आधुनिक जगातील एक जिव्हाळ्याचा विषय आहे. स्वाभाविकपणेच *समाजविज्ञान कोशा*त हा विषय विस्तृतपणे मांडलेला आहे. सर्वसंग्राहक अशा *विश्वकोशा*त त्यास तुलनेने कमी जागा लाभलेली आहे.

*समाजविज्ञान कोशा*तील 'क्रांती १' आणि 'क्रांती व प्रतिक्रांती' या दोन भागांत क्रांती या विषयाचे समाजवैज्ञानिक विवेचन केलेले आहे व या दोन भागांची मिळून होणारी

अनुक्रमणिका






शब्दसंख्या सु. ११,६०० होते. हाच विषय *विश्वकोशात* सु. ३७०० शब्दांत दिलेला आहे.

*समाजविज्ञान कोशा*तील 'क्रांती - २' ही उपनोंद म्हणजे फ्रेंच, रशियन व चिनी राज्यक्रांत्यांचे विवेचन करणारी आहे. या नोंदीची शब्दसंख्या सु. ६८०० शब्द आहे. *विश्वकोशात* फ्रेंच व रशियन राज्यक्रांत्यांवर स्वतंत्र नोंदी आहेत. चिनी राज्यक्रांतीवर स्वतंत्र नोंद नाही. तथापि क्रांतिविषयक चिनी संकल्पनेचा थोडक्यात परामर्श 'क्रांती' या नोंदीतच घेण्यात आलेला आहे. शब्दसंख्येच्या दृष्टीने पाहता फ्रेंच व रशियन राज्यक्रांत्यांवरील या दोनही कोशांतील नोंदीत फार मोठा फरक नाही, हे उल्लेखनीय आहे.

'क्रांती' या मुख्य विषयावरील या दोन्ही कोशांतील नोंदी तात्त्विक स्पष्टीकरणाच्या पातळीवर असल्या तरी त्या वर्णनात्मक स्वरूपाच्याच अधिक आहेत. दोन्ही कोशकारांची भूमिका जिज्ञासू वाचकाला क्रांतीची संकल्पना सुबोधपणे समजावून सांगण्याची आहे.

*समाजविज्ञान कोशात* समाजवैज्ञानिक परिभाषा वापरण्यावर स्वाभाविकपणेच भर आहे. *विश्वकोशा*तील नोंद इतिहासाच्या तत्त्वज्ञानातील परिभाषा वापरण्यावर भर देत असावी, असे दिसते. *विश्वकोशा*तील नोंद गच्च विचारबांधणीत उभी केलेली आहे. क्रांती या विषयाचे अनेक पदर ती कमीअधिक उलगडत व अनेकदा केवळ सूचित करीत पुढे पुढे जाते. *समाजविज्ञान कोशा*तील नोंद माहितीपूर्ण व अनेक संदर्भ व अर्थ स्पष्ट करीत करीत वाटचाल करते. एक वाचक म्हणून मनावर असा एक ठसा उमटतो की, तत्त्वप्रधान विश्लेषण करणाऱ्या *विश्वकोशा*तील नोंदीला तपशीलप्रधान वर्णन करणाऱ्या *समाजविज्ञान कोशा*तील मांसल नोंदीची जोड द्यावी! क्रांतीचे शरीर व आत्मा या दोन्ही गोष्टी समजून घेण्यासाठी दोन कोशांतील या दोन नोंदी परस्परपूरक ठरतात किंवा आपण त्या परस्परपूरक करून घ्याव्यात!

## ४. शिवाजी

अ) *महाराष्ट्रीय ज्ञानकोश* : विभाग २० : पृष्ठ ८१, सु. १५० शब्द.

आ) *भारतवर्षीय मध्ययुगीन चरित्रकोश* : पृष्ठे ७७५ ते ७७९, सु. ३३०० शब्द.

छत्रपती शिवाजी महाराजांवरील *ज्ञानकोशा*तील नोंद अगदी छोटी आहे. छत्रपतींच्या आयुष्यातील जन्मापासून मृत्यूपर्यंतचे महत्त्वाचे चारपाच टप्पे कालनिर्देशासह नमूद करून ही नोंद संपवलेली आहे. तथापि शिवचरित्राचा विस्तृत आलेख *ज्ञानकोशा*त इतरत्र घेतल्याचे या नोंदीत नमूद केले आहे. तो संदर्भ असा :

१) *महाराष्ट्रीय ज्ञानकोश* : विभाग ४ : बुद्धोत्तर जग : पृष्ठे ४२६ ते ४३५, सु. ७२०० शब्द

२) *महाराष्ट्रीय ज्ञानकोश* : विभाग १९

यातील 'महाराष्ट्रीय ऊर्फ मराठी साम्राज्य' या नोंदीतही शिवचरित्राचा भाग आलेला आहे.

*ज्ञानकोशा*तील ही नोंद-रीत काहीशी अवघड आहे, चमत्कारिक आहे असे एखाद्या आजउद्याच्या वाचकाला वाटणे स्वाभाविक आहे. तथापि ज्या काळात आणि परिस्थितीत *ज्ञानकोशा*सारख्या प्रचंड सर्वसंग्राहक कोशाचे काम करावे लागले, त्या काळाचा व परिस्थितीचा विचार करता ही गोष्ट काहीशी स्वाभाविक होती, असेच म्हटले पाहिजे. ज्ञानकोशकारांना केवळ ज्ञानविषयांचे संकलन व संपादन करून भागण्यासारखे नव्हते, तर मूलभूत संशोधन व चिकित्सा करणेही अपरिहार्य होते. म्हणूनच 'बुद्धोत्तर जग' या विभागात शिवचरित्र देण्याची गरज त्यांना भासली असावी.

ज्ञानकोशकारांपुढे भारतीय इतिहासाचे एक प्रदीर्घकालीन व प्रचंड गुंतागुंतीचे व्यापक परिप्रेक्ष्य होते. या बृहद्-परिप्रेक्ष्यातच शिवचरित्र व शिवकर्तृत्व यथार्थपणे समजावून घेता येईल, अशी त्यांची अटकळ होती. माहिती, संशोधन, मीमांसा व मूल्यमापन अशा विविध अंगांनी ज्ञानकोशकारांनी शिवाजी महाराजांना साकार केले आहे. एका महान इतिहासाचा शिल्पकार म्हणून भारतीय इतिहासाच्या समग्र परिप्रेक्ष्यात छत्रपतींकडे पाहणे व पाहावयास लावणे ज्ञानकोशकारांना इष्ट वाटले.

भारतवर्षीय चरित्रकोशकारांनी आपल्या *मध्ययुगीन चरित्रकोशात* (कालखंड : मौर्यकाल ते पेशवाई अखेर – १८१८) छत्रपती शिवाजीवरील विस्तृत नोंद दिलेली आहे. या दुसऱ्या खंडातील इतर चरित्रविषयक नोंदींच्या तुलनेने पाहता शिवचरित्रावरील नोंद खूपच विस्तृत आहे. ही नोंद मुख्यतः माहितीपर व संकलनात्मक स्वरूपाची आहे व हे तिचे स्वरूप कोशप्रकृतीशी सुसंगतच ठरते. विशेष म्हणजे माहिती विश्वसनीय व साधार आहे, हे लक्षात आणून देण्यासाठी नोंदीत ठायी ठायी संदर्भसाहित्याचा संक्षिप्त निर्देश केलेला



अनुक्रमणिका

आहे. कोशकारांनी नमूद केल्याप्रमाणे चरित्रकोशातील नोंदी मुख्यतः संकलन व 'यथाशक्ति संशोधन' यावर आधारलेल्या आहेत. शिवचरित्रा-वरील नोंदीतील यथाशक्ति संशोधन हे संकलनात्मक स्वरूपाचेच अधिक आहे. या नोंदीत मीमांसा वा मूल्यमापन नाही.

## ५. महात्मा गांधी आणि गांधीवाद

अ) *भारतीय समाजविज्ञान कोश* : खंड २ :

१. गांधी, म. मोहनदास करमचंद्र : पृष्ठे ३८५ ते ३९०, शब्दसंख्या सु. २८००

२. गांधीवाद : पृष्ठे ३९० ते ३९४, शब्दसंख्या सु. २२००

आ) *मराठी तत्त्वज्ञान महाकोश* : खंड १ : पृष्ठे ५३३-३४, शब्दसंख्या सु. ७००.

गांधीवादावरील हे विवेचन 'तत्त्वज्ञान (भारतातील) इंग्रजीतील' या नोंदीमध्ये आलेले आहे.

इ) *मराठी विश्वकोश* : खंड ४ :

१. गांधी, महात्मा : पृष्ठे ९३८ ते ९४२, सु. ३६०० शब्द

२. गांधीवाद : पृष्ठे ९४२ ते ९४४, सु. २००० शब्द

म. गांधी हे रूढ अर्थाने तत्त्वज्ञानी नव्हते; ते वेगळ्या व व्यापक अर्थाने एक महापुरुष होते. त्यामुळे *तत्त्वज्ञान महाकोशात* त्यांच्यावर व्यक्तिचरित्रपर स्वतंत्र नोंद नाही, हे समजू शकते. मात्र गांधीवाद हे एक आधुनिक भारतीय 'दर्शन' आहे व त्यामुळे 'भारतातील तत्त्वज्ञान' या विस्तृत नोंदीमध्ये गांधीवादाचे विवेचन हा कोश करतो. या कोशाचे जे ज्ञानशाखीय व्यापक व वैश्विक परिप्रेक्ष्य आहे, त्या संदर्भात गांधीवादाची त्यात केलेली ही व्यवस्था योग्यच ठरते.

*तत्त्वज्ञान महाकोशात* गांधीवादाचे विवेचन त्यातील औपनिषदिक, बायबलीय, ईश्वरदत्त प्रेरणा, नैसर्गिक श्रद्धाशीलता अशा तात्त्विक अंगांनी व परिभाषेत केलेले आहे. गांधीवादाचे हे तत्त्वज्ञानात्मक विश्लेषण म्हणता येईल. गांधीवादाचा तात्त्विक गाभा थोडक्यात स्पष्ट करण्याचा व तोही पारिभाषिक पेहेरावात असे या विवेचनाचे वैशिष्ट्य आहे. गांधीवादाच्या व्यक्तिगत व सांस्कृतिक संदर्भांची तसेच ऐतिहासिक अटळतेची दखल या नोंदीत घेतलेली नाही. गांधीवादाची तत्त्वज्ञानात्मक स्वायत्तता व स्वयंपूर्णता या परामर्शात गृहीत धरलेली आहे व ही भूमिका या कोशरीतीशी सुसंगत आहे.

म. गांधींवरील चरित्रपर नोंदी *समाजविज्ञान कोश* व *विश्वकोश* या दोहोंतही आहेत. एक गंमतीदार गोष्ट म्हणजे, या दोन्ही कोशांतील चरित्रपर नोंदींची सुरुवात गांधींच्या जन्मतारखेने केलेली आहे. रूढ कोशलेखनाच्या संकेतानुसार चरित्रपर नोंदींचा आरंभ हा, चरित्रव्यक्तीची ठसठशीत व नेमकी ओळख करून देणाऱ्या वाक्याने होतो. कदाचित म. गांधी हे मराठी वाचकाला अतिपरिचित असल्याची खात्री या दोन्ही कोशकारांना असावी.

*समाजविज्ञान कोशा*तील म. गांधींवरील नोंद मुख्यतः माहितीपर आहे. द. आफ्रिकेतील लढा, मिठाचा सत्याग्रह, खिलाफत चळवळ या प्रकारच्या उपशीर्षकांखाली गांधीचरित्राचे महत्त्वाचे कार्यटप्पे वर्णन केलेले आहेत. गांधीचरित्राचा एक घटनाप्रधान आलेख या वर्णनातून उमटतो. चारित्र्य, व्यक्तिमत्त्व, अंतर्मन यांसारख्या अंगांनी महात्माजींचा आतला मनोमय संघर्ष क्वचितच सूचित होतो. खासगी जीवनालाही हलकासा स्पर्श करणारे हे विवेचन आहे.

*समाजविज्ञान कोशा*तील 'गांधीवाद' ही नोंद स्थूल अंगांनी जाणारी, निश्चित कृतप्रत्ययाने – conviction ने – गांधीवादाला न उलगडणारी, त्यातील तात्त्विक अंतःसूत्रांकडे फारशी आकृष्ट न झालेली व प्रतिकूल मूल्यमापनाकडे झुकलेली आहे असे वाटते. अर्थात माझी ही प्रतिक्रिया प्रातिनिधिक नसून व्यक्तिगत आहे व म्हणून ती मर्यादित अर्थानेच ग्राह्य ठरणार हे उघडच आहे. याउलट, *समाजविज्ञान कोशा*तील गांधीवादाचे हे विवेचन कदाचित मराठी समाजाच्या दृष्टीने प्रातिनिधिक आहे, असेही कुणाला वाटेल. या प्रकारचे मतभेद कोशवाचकांत असणारच, हे लक्षात घेतले पाहिजे.

*विश्वकोशा*तील म. गांधींवरील चरित्रपर नोंद *समाजविज्ञान कोशा*तील नोंदीपेक्षा थोडी मोठी आहे; तर गांधीवादावरील या दोन्ही कोशांतील नोंदी जवळजवळ सारख्याच लांबीच्या आहेत. गांधीवादाचा सामाजिक व समाजवैज्ञानिक गाभा मोठा व महत्त्वाचा आहे. खरे तर गांधीवादाचा जन्मच मुळी भारतीय संस्कृतीच्या कुशीतून झालेला आहे. त्यामुळे *समाजविज्ञान कोशा*त हा विषय अधिक विस्तृतपणे व सखोलपणे आला असता, तर मराठी कोशवाचकाला त्याचा फारच उपयोग झाला असता, असे वाटते.

*विश्वकोशा*तील चरित्रपर नोंद ही माहितीच्या दृष्टीने पुरेशी असली, तरी तीत अधूनमधून येणारी वृत्तपत्रकार गांधी, साहित्यिक गांधी यांसारखी उपशीर्षके काहीशी उपटसुंभासारखी वाटतात. उपशीर्षकांसंबंधीचा काटेकोर विवेक या लेखनात जाणवत नाही. उपशीर्षकांखालील मजकूर ठिगळवजा वाटतो. चरित्रात्मक नोंदलेखनाचा एक एकात्म, सलग व प्रवाही असा आकृतिबंध या नोंदीला लाभत नाही.

दुसरे असे की, *विश्वकोशा*तील या चरित्रपर नोंदीत भारतीय स्वातंत्र्याच्या आंदोलनाचे एक परिप्रेक्ष्य नजरेसमोर ठेवल्याचे जाणवते. म्हणूनच की काय, 'भारतातील सार्वजनिक जीवन' यासारख्या ऐसपैस व काहीशा अकाटेकोर उपशीर्षकाखाली गांधीजींच्या कार्याची ओळख करून दिलेली आहे. स्वातंत्र्याचे आंदोलन व गांधीचरित्र एकरूप आहेत हे खरेच! त्या अर्थाने गांधीचरित्राचा एक व्यापक संदर्भ ही नोंद वाचकाला जाणवून देते, असे म्हणता येईल.

म. गांधींवर कोशीय चरित्रलेखन करणे हे अर्थातच एक आव्हान आहे. गांधीचरित्रातील घटना व त्यांचा कालानुक्रम अचूक ठेवणाऱ्या दोन मराठी कोशांतील या दोन नोंदी परस्परपूरक ठरतात. अशा अर्थाने की, या नोंदी एकमेकांतील न्यूनाधिक्य पुरते-सरते करून घेतात व म्हणून मराठी कोशवाचकाने या दोन्ही नोंदी वाचणे गरजेचे ठरते.

*विश्वकोशा*तील गांधीवादावरील नोंद एक चांगले व उद्बोधक वाचन ठरते. विवेचन-विश्लेषणाची एक सहजधार त्यातून प्रवाहित झाल्याचे जाणवते. गांधीवादाचे समग्र स्वरूप या नोंदीतून जाणकार वाचकांना कदाचित आढळणार नाही; म्हणजे गांधीवादातील तात्त्विक-दार्शनिक आशय योग्य त्या परिभाषेतून उलगडल्यासारखे त्यास वाटणार नाही; परंतु जिज्ञासू सामान्य वाचकाला गांधीवादाची चौकट, त्यातील मौलिक आशयसूत्रे व त्यांचे मूल्य यांची पुरेशी ओळख या नोंदीतून होऊ शकेल. गांधीवादाची प्रत्ययकारी मीमांसा या नोंदीतून आलेली आहे. ती परिणामकारक ठरते. गांधीवादाचे अनुकूल मूल्यमापन या नोंदीत आढळते.

वरील तीनही कोशांतील गांधीवादाचे विवेचन वाचणे म्हणजे बौद्धिक श्रीमंतीची प्राप्ती करून घेणे, असेच मराठी कोशवाचकाला वाटेल.

येथवर मराठी विषयकोशातील कृष्ण, क्रांती, भगवद्गीता, शिवाजी व म. गांधी या पाच विषयांवरील नोंदींचे तुलनात्मक तपशील तसेच काही निरीक्षणे नमूद करण्याचा प्रयत्न केला आहे. हा प्रयत्न केवळ एक जिज्ञासू व सर्वसामान्य असा कोशवाचक या नात्याने व नम्रतेने केलेला आहे. या प्रकारचा पाच नोंदीवरील तौलनिक अभ्यास इतरही कोशवाचक करू शकतील व आपापली वेगवेगळी निरीक्षणे सांगू शकतील. तेव्हा कोणत्याही अधिकाराच्या व तज्ज्ञतेच्या भूमिकेतून हा अभ्यास मांडलेला नाही, हे उघड आहे. कोशगत माहिती, मीमांसा व मूल्यमापन समजावून घेताना जेवढा डोळसपणा अधिक, तेवढा त्या माहिती-मीमांसा-मूल्यमापनाचा उपयोग अधिक नेमका व अचूक होऊ शकतो. म्हणूनच माझ्या व्यक्तिगत क्षमतेच्या मर्यादेत हा तौलनिक अभ्यासाचा प्रयत्न मी केला. मराठीत बहुविध व चांगले कोशवाङ्मय आता उपलब्ध आहे. या वाङ्मयाचा अधिकाधिक व अधिक चांगल्या प्रकारे उपयोग होण्यासाठी या तौलनिक अभ्यासाची अंशतः तरी मदत होईल.

## कोशवाङ्मयाची उपयुक्तता

### यूरोपीय वाटचालीचा स्थूल मागोवा

यूरोपीय कोशवाङ्मयाला साधारणपणे दोन हजारांहून अधिक वर्षांची परंपरा असली, तरी आधुनिक यूरोपीय कोशरचनेच्या उत्क्रांतीला सुमारे दोनशे वर्षांचाच इतिहास आहे. १७२८ मधील चेंबर्सचा 'सायक्लोपीडिया' या इतिहासाच्या उगमस्थानी आहे. फ्रेंच *एन्सायक्लोपीडिया* (१७५१-६५), *ब्रिटानिका* (१७६८) इत्यादी प्रकल्पांतून आधुनिक यूरोपीय कोशरचना स्थिर झाली व पुढील काळात एक प्रगत परंपरा म्हणून सतत विकसित होत गेली. ज्ञानसंकलक कोशाचे मुख्य उद्दिष्ट शैक्षणिक होते. त्यात मूलभूत असा बदल नंतरही झालेला दिसत नाही. ज्ञानविषयांची निवड व विवेचन यांसारख्या बाबतीत वेगवेगळे प्रकार व प्रयोग होत राहिले हे खरे, पण त्यांच्या मुळाशीही बदलत्या कोशवाचकांच्या नव्या नव्या ज्ञानविषयक शैक्षणिक गरजांना प्रतिसाद देण्याचेच धोरण होते. जिज्ञासूंना इष्ट त्या विषयातील प्राथमिक माहिती व संदर्भ सुबोधपणे पुरवणे व त्यांच्या ज्ञानसंपादनात मदत करणे, हेच अत्याधुनिक यूरोपीय कोशरचनेचेही प्रयोजन आहे.

कोशवाङ्मयाची उपयुक्तता वाढवण्याचे प्रयत्न गेल्या दोनशे वर्षांच्या कालखंडात सातत्याने केले जात आहेत. या संदर्भात एक गमतीदार प्रयोग म्हणजे पोर्टेबल एन्सायक्लोपीडिया! १८१७

अनुक्रमणिका

साली सी.टी. वॉटकिन्स यांनी या प्रकारचा एक विश्वकोश तयार केला होता. पॉकेट-बुक्सप्रमाणे छोट्या आकारातील ज्ञानकोशही उपलब्ध आहेत. संगणकशास्त्राचा उपयोग करून दृक्श्राव्य कोश व कॅसेट्सही उपलब्ध होऊ लागण्याची शक्यता आहे. झटपट-ज्ञान (इन्स्टंट नॉलेज) हा यापुढील कोशरचनेचा नवा ध्रुवतारा ठरणार हे स्पष्टच दिसते. नव्या सायबरनेटिक्सच्या आधारे एकूणच ज्ञानव्यवहाराची पारंपरिक बैठक व चौकट मूलभूतपणे बदलून जाण्याची शक्यता दिसत आहे.

तथापि एका नव्या प्रयोगाकडे लक्ष वेधावे असे मला वाटते. हा प्रयोग म्हणजे *एन्सायक्लोपीडिया ब्रिटानिका*च्या १९७७ मधील पंधराव्या सुधारित आवृत्तीचा! या कोशाला आधीच्या दोनशे वर्षांची परंपरा आहे व त्याच्या पूर्वकालीन चौदा आवृत्यांमधूनही कमीअधिक स्वरूपाचे प्रयोग करण्यात आलेले होते. अर्थात कोशाची बदलत्या काळानुरूप उपयुक्तता वाढवणे, हेच त्या सर्व प्रयोगांमागील उद्दिष्ट होते. तथापि १९७७ च्या आवृत्तीमधील प्रयोगाचे वर्णन 'कोशरचनेतील क्रांती' (रेव्होल्युशन इन एन्सायक्लोपीडिया-मेकिंग) अशा शब्दांत त्या कोशकारांनी केलेले आहे. हे क्रांतिकारकत्व नेमके कशात आहे, हे समजून घेणे उद्बोधक ठरेल.

*ब्रिटानिका*चे कोशमंडळ १९४७ सालापासून ज्ञान-विज्ञानांच्या नव्या मांडणीचा विचार करीत होते. याचे कारण, विलक्षण वेगाने वाढणाऱ्या शेकडो ज्ञानशाखांतील हजारो विषयांना कोशीय मर्यादेत कशा प्रकारे गवसणी घालता येईल, ही समस्या त्यांना भेडसावीत होती. सामान्य वाचक व विशेष वाचक, संपूर्ण ज्ञान व सारभूत ज्ञान, आधुनिक धावपळीच्या जीवनात ज्ञानसंपादन व त्याचा उपयोग यासाठी उपलब्ध होणाऱ्या मोजक्या उसंतीची समस्या आणि ज्ञानविज्ञान विषयांचे नवे सांस्कृतिक संदर्भ व दृष्टिकोण या सर्वच महत्त्वाच्या कोशघटकांचा नव्याने विचार करण्याची कालोचित निकड होती. नव्या कोशीय मांडणीची निश्चिती करण्यापूर्वी वरील सर्व बाबतीत नेमकी वस्तुस्थिती काय आहे, याची खात्री करून घेणे आवश्यक होते. या दृष्टीने सुमारे तीस वर्षे तज्ज्ञ मंडळींचा अभ्यास चालू होता. कोशरचनेचे नवे नवे मसुदे तयार होत होते व त्यांवर तपशीलवार चर्चा घडवून आणली जात होती. *ब्रिटानिका*चा रूढ ढाचा हा अकारविल्हे केलेल्या नोंदीचा होता व भर होता तो मुख्यतः मानव्य विद्यांवर! या प्रकारची मांडणी मूलतः न बदलता या कोशाच्या आवृत्त्या निघत राहिल्या. वार्षिक-खंडाच्या प्रतिवर्षी निघणाऱ्या पुरवणी-प्रकाशनातून नव्या नव्या ज्ञानविषयांची ओळख करून देण्यात येई व जुन्या विषयांबद्दलची नवी मौलिक माहिती पुरवण्यात येई. तथापि कोशवाचकाला अद्ययावत अशी जागतिक पातळीवरील निवडक माहिती पुरवण्याचा त्या कोशयंत्रणेचा त्यामागील दृष्टिकोन महत्त्वाचा होता.

*ब्रिटानिका*च्या पुनर्रचनेचा प्रश्न मुख्यतः नोंदविषयांच्या व्याप्तीचा व निवडीचा नव्हता. सूर्याखालील सर्व ज्ञानविज्ञानविषय सूर्यासकट या सर्वविषयसंग्राहक कोशात येणे हे गृहीतच धरलेले होते. या विशाल अशा आधुनिक ज्ञानक्षेत्राची सर्वसामान्य वाचकाच्या पातळीवर जी जिज्ञासा संभवते, त्या जिज्ञासेचे स्वरूप नेमके कशा प्रकारचे असते व तशा प्रकारच्या जिज्ञासेची परिपूर्ती जास्तीत जास्त चांगल्या प्रकारे म्हणजे समाधानकारक रीतीने कशा प्रकारे करता येईल, असा प्रश्न *ब्रिटानिका*च्या कोशकर्त्यांपुढे होता. हा प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न तज्ज्ञ अभ्यासक व समित्या तीस वर्षे करीत होत्या. अनेक मसुदे, आराखडे, आकृतिबंध तयार केले जात होते व त्यांसंबंधी सखोल तपशिलवार चर्चा होत होत्या.

सर्वसामान्य कोशवाचकाच्या पातळीवर दोन प्रकारची जिज्ञासा काम करताना दिसते. एक प्रकार म्हणजे केवळ वस्तुस्थितिदर्शक पण परिपूर्ण माहितीसंबंधीची जिज्ञासा व दुसरी म्हणजे माहितीच्या लक्षणीय अंगांची अन्वयपूर्वक मांडणी करणारी ज्ञानविषयक जिज्ञासा! कोशवाचकाच्या या दुहेरी अपेक्षांचे भान ठेवून कोशातील ज्ञानविषय सामान्य कोशवाचका-पर्यंत कसे पोचविता येतील, याचा मागोवा घेण्याचा प्रयत्न *ब्रिटानिका*च्या पंधराव्या आवृत्तीत (१९७७) फलद्रूप झाला.

त्या दिशेने या आवृत्तीत लघुकोश (१० खंड), बृहत्कोश (२० खंड) व पथदर्शी कोश (१ खंड) अशी पुनर्रचना करण्यात आली. त्यांना अनुक्रमे 'मायक्रोपीडिय', 'मॅक्रोपीडिया' व 'प्रोपेडिया' अशा इंग्रजी संज्ञा आहेत. अकारविल्हे रचलेल्या लघुकोशाच्या दहा खंडांतून प्रत्येक नोंदविषय सामान्यपणे ७५० शब्दांच्या मर्यादेत देण्याचा प्रयत्न करण्यात आलेला आहे. तथापि ही शब्दमर्यादा लवचीक राखून तीत कमीअधिक फरक तारतम्याने केला आहे. वस्तुस्थितिदर्शक माहिती देण्यावर लघुखंडातील नोंदीचा भर आहे. चरित्रे, घटना, राजवटी, संकल्पना तसेच भौगोलिक विषय, यंत्रतंत्रविषयक नोंदी या

माहितीप्रधान स्वरूपाच्या व संक्षिप्तपणे दिलेल्या आहेत. त्यासंबंधीची अधिक माहिती व मीमांसा बृहत्कोशात मिळू शकते व या संदर्भात वाचकाला योग्य प्रकारे मार्गदर्शनही केलेले असते. माहितीची गरज असणारा कोशवाचक संख्येने मोठा असतो, असेही दिसून येते. आपापल्या विशिष्ट ज्ञानक्षेत्रात विशेष जाणकार असलेल्या वाचकांनाही अनेकदा इतर विषयांसंबंधी स्थूल ओळख करून देणारी माहिती हवी असते. लघुकोशाच्या रूपाने या प्रकारच्या गरजा भागविण्याची सोय झालेली आहे.

खरे तर माहिती व मीमांसा या दोन बाजू कोणत्याही ज्ञानविषयाच्या अंगभूत बाजू असतात व त्या अलग करणे वा मानणे योग्य नसते. तथापि कोशवाचकाच्या गरजा लक्षात घेऊन केवळ सोयीसाठी या दोन बाजू अलग करून पुन्हा सलग करणे शक्य असते. नव्या *ब्रिटानिका*च्या मांडणीत लघुकोश व बृहत्कोश यांच्या आधारे या प्रकारे माहिती व मीमांसा यांतील अलगता व सलगता साध्य करण्याचा प्रयत्न केला आहे. तथापि ही ब्रिटानिका-शैली ज्ञानविषयाच्या माहिती व मीमांसा यातील विभाजनाची फक्त एक दिशा दाखविणारी आहे; ती अंतिम दिशा नव्हे.

माहिती व मीमांसा या दोन बाजूंव्यतिरिक्त प्रत्येक ज्ञानविषयाला आणखी एक बाजू असते. ही तिसरी बाजू म्हणजे त्या ज्ञानविषयाचे एकूण ज्ञानक्षेत्रातील नेमके स्थान! शिवाजी महाराज हा ज्ञानविषय इतिहासातील, तसेच महाराष्ट्र व भारत यांच्या भूतकालीन संस्कृतीमधील एका गुंतागुंतीच्या ज्ञानक्षेत्राशी निगडित असतो. माहितीच्या पातळीवर तो शिवाजी महाराजांच्या चरित्रात्मक तपशीलांपुरता हाताळता येतो, मीमांसेच्या पातळीवर तो प्रांतिक, राष्ट्रीय इतिहासक्रमाच्या परिप्रेक्ष्यात अर्थपूर्ण करून स्पष्ट करता येतो तर ज्ञानक्षेत्रातील स्थानाच्या दृष्टीने धर्म, तत्त्वज्ञान, समाजविज्ञाने, इतिहासाचे तत्त्वज्ञान यांसारख्या मानव्य विद्यांच्या वर्तुळात मोडतो. मानव्य विद्या, विज्ञाने व तंत्रविद्या अशी तीन प्रमुख ज्ञानक्षेत्रे *मराठी विश्वकोशा*त स्वीकारलेली आहेत. तथापि या त्रिविध ज्ञानक्षेत्रांची माहिती, मीमांसा व परस्परसंबंध यांची चर्चा *मराठी विश्वकोशा*त केलेली नाही. *ब्रिटानिका*च्या नवीन पंधराव्या आवृत्तीमधील पथदर्शी कोशात (प्रोपीडिया) या प्रकारची ज्ञानविज्ञानक्षेत्राच्या विस्तृत परिघाची मीमांसा केलेली आहे आणि जिज्ञासू कोशवाचकांनी ती आवर्जून वाचावी, अशी अपेक्षाही व्यक्त केलेली आहे.

या पथदर्शी कोशात ज्ञानवर्तुळाची कल्पना विशद केली आहे. या ज्ञानवर्तुळाचे दहा घटक आहेत. ते असे : १. द्रव्य आणि ऊर्जा (मॅटर अँड एनर्जी), २. पृथ्वी (द अर्थ), ३. जीवसृष्टीची गूढता (मिस्टरीज ऑफ लाइफ), ४. वैश्विक अनाथता (द कॉस्मिक ऑर्फन), ५. मनुष्य : एक सामाजिक प्राणी (मॅन, द सोशल ॲनिमल), ६. कला (आर्ट), ७. तंत्रविद्या (टेक्नॉलॉजी), ८. धर्म : एक प्रतीकात्म दर्शन (रीलिजन ॲज सिम्बलिझम), ९. इतिहासवाचनातील आनंद व अर्थ (द पॉइंट ॲण्ड प्लेझर ऑफ रीडिंग हिस्टरी), १०. ज्ञानाची स्वसंवेद्यता किंवा त्याचे आत्मभान (नॉलेज बिकम सेल्फ-कॉन्शस).

*ब्रिटानिका*कारांनी अत्याधुनिक ज्ञानक्षेत्राचे हे दशदिशादर्शन पुरस्कृत केले आहे, ते अंतिम आहे किंवा सर्वमान्य ठरणारे आहे असे नव्हे. पण कोणताही ज्ञानविषय हा स्वायत्त व स्वयंपूर्ण नसून तो एका व्यापक ज्ञानक्षेत्राशी निगडित आहे; एवढेच नव्हे तर, संबंधित अशा त्या ज्ञानक्षेत्राशी इतरही काही ज्ञानक्षेत्रे निगडित असू शकतात, याची जाणीव करून देणारी ही महत्त्वाची व्यवस्था आहे. विशेषज्ञांच्या विजयी घोडदौडीच्या विद्यमान काळात शतशः खंडित होत जाणारे ज्ञानवर्तुळ नीटपणे सांधण्याचा व विशिष्ट अशा एकाच एका ज्ञानक्षेत्राच्या हस्तिदंती मनोऱ्यातून बाहेर पडण्याचा हा प्रयत्न आहे. विविध प्रकारची ज्ञानक्षेत्रे स्वायत्त असली, तरी अखेर ती परस्परसापेक्ष आहेत, आणि या परस्परसापेक्षतेचा मूलाधार म्हणजे मनुष्यसंस्कृतीच्या विकासाची व संपन्नतेची हमी देणे हाच आहे, ही जाणीव महत्त्वाची आहे. सर्व प्रकारचे ज्ञान व माहिती ही माणसाच्या भल्यासाठी आहे व हा बंधच सगळ्या ज्ञानक्षेत्रांना परस्परसन्मुख राखणारा आहे, याचे भान असणे आवश्यक आहे. एक प्रकारे ज्ञानैक दृष्टीचे आत्मभान, ज्ञानोपासनेतील मानवी मूल्यभावाची जाणीव व्यापक करण्याचा हा प्रयत्न आहे. ज्ञानक्षेत्रातील हा महत्त्वाचा सापेक्षतावाद होय, असे म्हणता येईल. याची गरज कदाचित पंडितांना, विद्वानांना नसेल; पण सामान्य माणसाला मात्र त्याची उपयुक्तता मोठी आहे. ज्ञानाचे विशेषीकरण अटळ असेल; पण त्याची व्यापक जीवनसापेक्षता जाणून घेणेही आवश्यक आहे. *ब्रिटानिका*कारांनी पथदर्शी कोशाची मांडणी करून बहुधा याच बाबीकडे कोशवाचकाचे लक्ष वेधलेले आहे.

ही पथदर्शी कोशाची कल्पना आदर्श आहे, असे नव्हे;

तीत प्रत्येक समाजातील कोशकर्त्यांनी आपापल्या गरजांनुसार योग्य ते बदल करणे योग्य ठरेल. तथापि आजउद्याच्या कोशकर्त्यांनी आपल्या वाचकांसाठी व्यापक ज्ञानवर्तुळाचा परिचय करून देणे उद्‌बोधक ठरेल. आणि या ज्ञानवर्तुळाच्या परिप्रेक्ष्याचे नेमके भान ठेवूनच आपल्या कोशातील प्रत्येक ज्ञानविषय त्यांना हाताळावा लागेल.

लघुकोश, बृहत्कोश ही विभागणी आदर्श वा अनुकरणीय आहे असे म्हणता येणार नाही. तथापि माहिती, मीमांसा व ज्ञानाचे परिप्रेक्ष्य ही त्रिमिती मात्र कोशकारांनी लक्षात घेणे आवश्यक आहे. *ब्रिटानिका*च्या पंधराव्या सुधारित आवृत्तीमधील क्रांतिकारकत्व कदाचित याच गोष्टीत असावे, असे मला वाटते.

❊❊









अनुक्रमणिका

# अक्षरवेध

**शुक्रवारची कहाणी; प्रतिभा रानडे, श्रीविद्या प्रकाशन, पुणे १९९७; किंमत रु. १६०/-.**

प्रतिभा रानडे यांनी जून १९९३ ते मे १९९४ या वर्षभराच्या कालावधीत दैनिक 'लोकसत्ते'मधून दर शुक्रवारी वरील शीर्षकाचे सदर चालविले होते. या सदरातील सर्व लेख अधिक 'महाराष्ट्र टाइम्स'मधील त्याच विषयावरील चार लेख यांचा एकत्रित संग्रह म्हणजे हे छोटेखानी पुस्तक होय. दैनिक 'लोकसत्ते'चे संपादक श्री. अरुण टिकेकर यांच्या आग्रहावरून स्त्रीवादी दृष्टिकोणातून हे सदर लेखिकेने लिहिले. स्त्रीवादी दृष्टिकोणाचे तीन टप्पे म्हणजे स्त्रियांच्या व्यथांचे भान, त्या व्यथांच्या मुळाशी असलेली मूल्यव्यवस्था आणि स्त्रियांच्या समस्या सोडविण्यासाठी उपाययोजना हे होत, असे लेखिकेने म्हटले आहे.

या संग्रहातील पहिला लेख आहे, 'नव्या कहाण्या, नवी आव्हानं!' या लेखात १९९१ साली पुनर्मुद्रण झालेल्या *सचित्र कहाणीसंग्रह* या पुस्तकाचा उल्लेख करून त्या पुस्तकाचे मुखपृष्ठ मोठे मार्मिक असल्याचे लेखिकेने सूचित केले आहे. 'कापलेले केस खांद्यावर रुळणाऱ्या, स्लीव्हलेस ब्लाऊज घातलेल्या', लिपस्टिक लावलेल्या, गळ्यात मंगळसूत्र न घातलेल्या पाच तरुणींपैकी एकजण तर्जनी उभी करून कथा सांगताना त्यात दाखवली आहे. मुखपृष्ठावरील या चित्रातून लेखिकेला फार मोठे सत्य गवसले ते असे की, "कधी काळी पुराणकाळात रचिल्या गेलेल्या त्या कहाण्यांतल्या बायका, त्यांची सुख-दुःखं, त्यांच्या आशा-निराशा आणि चित्रात दाखवलेल्या आजच्या बायका यांची सुख-दुःखं, आशा-निराशा त्याच आहेत. मुलींच्या विवाहाची काळजी, नवऱ्यांकडून व सासरच्या माणसांकडून होणारा छळ, अवहेलना; मुलं न होणं या सर्वांमुळे वाट्याला येणारे नष्टचर्य संपविण्यासाठी, नोकरीपेशा करत आर्थिकदृष्ट्या स्वावलंबी असलेल्या सुशिक्षित बायकादेखील मुंबईसारख्या शहरात, भरगर्दीतील बसेस, लोकलगाड्यांमधून लोकांचे धक्के खात, हिंदकळत प्रवास करतानादेखील तळहाताएवढ्या छोट्या पोथ्या वाचतात, जप करतात. या बायका हिंदू, मुसलमान, ख्रिस्ती आहेत – सर्व स्तरांवरच्या आहेत." लेखिकेचे हे निरीक्षण सत्य असेल कदाचित, पण ते सार्वत्रिक वा प्रातिनिधिक स्वरूपाचे मात्र अजिबात वाटत नाही.

चौथ्या लेखाचे शीर्षक आहे, 'संपूर्ण स्त्री-जात नामशेष होण्याचा धोका!' या लेखात पुरुषजातीची आक्रमकता आणि लिंगपिसाट वृत्ती यासंबंधी अनेक उदाहरणे दिली आहेत. "रिंकू पाटील या शाळकरी मुलीला भरदिवसा जाळून टाकणारे, शाळा-कॉलेजातील मुलींची छेड काढून त्यांनी विरोध केला तर त्यांचा खून करायला न कचरणारे पुरुषीवृत्तीचे लिंगपिसाट" यांचे दाखले देऊन शेवटी लेखिका म्हणते, "गर्भातील मुलींना मारून टाकले जात आहे. तसेच जीवनाने रसरसलेल्या लहान मुलींना, तरुण सुनांना-बायकांनाही जाळून टाकले जातेय. विश्वाच्या जडणघडणीत कितीतरी पशुपक्षी नामशेष झालेत. त्यातीलच स्त्री हाही एक प्राणी, तिचं काय एवढं?" लेखिकेचा हा दृष्टिकोण भावनाप्रधान, हळवा, अतिशयोक्तिपूर्ण आणि अवैज्ञानिकही वाटतो. विश्वाच्या घडणीत व वाटचालीत पशु-पक्ष्यांच्या जाती नष्ट होताना जरूर दिसतात. पण कोणत्याही जातीतील केवळ मादी संपूर्ण नामशेष झाली आहे असे कधीच घडत नाही. लेखिकेने उल्लेख केल्याप्रमाणे 'स्त्री हाही एक प्राणी' नाही. मनुष्यप्राणिजातीतील ती मादी आहे. 'संपूर्ण स्त्रीजात नामशेष होण्याचा धोका' याचा अर्थ संपूर्ण पुरुषवर्गही नामशेष होण्याचा धोका असा होतो; कारण स्त्री ही स्त्रियांची तसेच पुरुषांचीही जन्मदात्री आहे. तेव्हा, स्त्रीवादी दृष्टिकोणा-तूनही बोलायचे झाले तर, पुरुष कधीही संपूर्ण स्त्री-वर्ग नामशेष होऊ देणार नाहीत, कारण ते आत्मघातकीपणाचे ठरेल. खरी चिंता स्त्रीवर्ग ही पुरुषवर्गाची कामवाली, करमणूक, पायाची दासी म्हणून टिकून राहणार आहे, का महाकवी कालिदासाने वर्णन केलेले 'गृहिणी, सचिव, सखी, प्रिया' हे स्थान स्त्रीला प्राप्त होणार आहे, या कळीच्या मुद्याबद्दल आहे. केवळ पुरुषांच्याच नव्हे तर स्त्रियांच्याही (सासू म्हणून, नणंद म्हणून, आई म्हणून आणि पत्नी म्हणून असलेल्या) मानसिकतेवर या प्रश्नाचे उत्तर अवलंबून राहील.

'बाईपणाच्या विषादाचा चित्र-प्रत्यय!' या लेखात लेखिका म्हणते, "दीर्घकाळपर्यंत भारतात आणि युरोपातही संसारी स्त्रियांना संगीतकला, चित्रकला, नृत्यकला या क्षेत्रांत संचार




करण्यास बंदी होती. याबाबतीत स्त्रियांवर एक प्रकारचा "कर्फ्यूच घातलेला असे. गेली पाचपंचवीस वर्षे बायका चित्रकलेचं पद्धतशीर शिक्षण घेऊन चित्रकारी करू लागल्या आहेत." स्त्री-चित्रकारांच्या चित्रांवर त्यांच्या भोवतीच्या वास्तवाचा होणारा परिणाम लेखिकेला लंडनमधल्या नॅशनल आर्ट म्युझियममध्ये पाहायला मिळाला. तेथे 'ट्वेंटिएथ सेंच्युरी कलेक्शन' या विभागातील चित्रांमध्ये स्त्रियांनी काढलेली दोन चित्रे आहेत. त्यांपैकी एक चित्र एका अमेरिकन स्त्रीने काढले आहे. चेहऱ्यावरचे भाव स्पष्ट नसलेला या अर्थाने, बिनचेहऱ्याचा, बलदंड, उघडबंब पुरुष तिने चितारला आहे. त्याच्या शरीराच्या मानाने अगडबंब असलेल्या लिंगाला बांधलेली पैशांनी गच्च भरलेली पिशवीही या चित्रात आहे. या चित्रावरील लेखिकेची प्रतिक्रिया पुढील शब्दांत व्यक्त झाली आहे : "समस्त स्त्री-जातीची गुलामी या चित्रात व्यक्त होते. बंदुकीची गोळी जिव्हारी लागावी तसे ते चित्र सण्णकन् जिव्हारी लागते." दुसरे चित्र एका कम्युनिस्ट स्त्रीने काढले आहे. कॅथीचा सोळा वर्षांचा मुलगा पहिल्या महायुद्धात मारला गेल्यावर ती सैरभैर झाली. त्या अवस्थेत तिने काढलेल्या या चित्रामध्ये तिच्या मृत मुलाला बघायला आलेल्या व्यक्तींची मांडणी एखाद्या क्लासिकल पेंटिंगमध्ये क्रूसावरून ख्रिस्ताला खाली उतरवणाऱ्याप्रमाणे आहे. देवधर्माला न मानणाऱ्या एका कम्युनिस्ट बाईला स्वतःचा मुलगा महायुद्धामध्ये हकनाक मारला गेल्यावर ख्रिस्ताचीच आठवण झाली. ("आपल्याप्रमाणेच युरोपमध्येही चित्रकार स्त्रिया आताआतापर्यंत झाल्याच नाहीत" असे निवेदन करत लेखिकेने उपरोक्त चित्राचा जो उल्लेख केला आहे ते चित्र मात्र ७०-७५ वर्षांपूर्वी काढलेले आहे!) "आज भारतामध्ये रिंकू-बिंदू जाळल्या जात आहेत. तान्ह्या मुलीपासून ते वयस्क स्त्रियांवरही अमानुष बलात्कार होत आहेत. पैशासाठी मद्रासच्या मेघनाला, मीरतच्या बीनाला ॲसिडची इंजेक्शने नवऱ्याने, सासरच्यांनी दिल्यामुळे त्या कणाकणाने मरत आहेत. आज सगळी स्त्री-जातच क्रूसावर चढविली जात आहे," या वास्तवाला भारतीय स्त्रीचित्रकारांनी सामोरे गेले पाहिजे असे आवाहन लेखिका करते. संगीत, चित्रकला, नृत्य या क्षेत्रांत प्रवेश करण्यावर कधीच कर्फ्यू नसलेल्या संसारी स्त्रिया भारतातील विविध आदिवासी जमातींमध्ये सर्रास आढळतात. खुद्द लेखिकेनेच म्हटल्याप्रमाणे, " 'मधुबानी' किंवा 'वारली' पद्धतीची चित्रकला त्या ठिकाणच्या बायकांनी आज जगाच्या नकाशावर नेऊन ठेवली आहे. त्या चित्रातले रेखांकन, मोजकेच रंग, त्यांची अनोखी गुंफण, लहानलहान चित्रांमधील भव्य पर्स्पेक्टिव्ह या गोष्टी आपल्याला एका विलक्षण अशा वेगळ्याच जगात घेऊन जातात." बाईपणाच्या विषादाचा चित्रप्रत्यय त्यांच्या चित्रात नाही; कारण आदिवासी समाजात स्त्री-पुरुष बरोबरीने नाचतात, गातात आणि चित्रेही काढतात. आदिवासी तरुण तरुणी 'घोटुल'मध्ये रोज रात्री एकत्र भेटतात, आणि परस्परांचा पुरेसा परिचय झाल्यावर स्वखुशीने विवाह ठरवतात. हे सहज, सुंदर नैसर्गिक जीवन निसर्गापासून दूर गेलेल्या तथाकथित सुसंस्कृत समाजात दिसून येत नाही ही खरी विषादाची गोष्ट आहे.

'मुद्दा आहे तो समाजमानस बदलण्याचा' असे शीर्षक असलेल्या लेखात असे म्हटले आहे की, इंडियन असोसिएशन फॉर वुइमेन्स स्टडीजच्या १९९३ च्या अहवालावरून, १९८७ ते १९९१ या चार वर्षांमध्ये स्त्रियांची होणारी मारहाण व छळ, पळवून नेण्याचे प्रमाण, जबरदस्ती बलात्काराचे प्रमाण आणि हुंडाबळी यामध्ये अनुक्रमे ३८ टक्के, ३६ टक्के, २७ टक्के आणि १७० टक्क्यांनी वाढ झालेली आहे. लेखिकेच्या मते हे अत्याचार निवारण्यामध्ये "मुख्य मुद्दा आहे तो समाजमानस बदलण्याचा, स्त्रियांकडे बघण्याच्या दृष्टिकोणात बदल घडविण्याचा." लेखिकेचा हा मुद्दा पटत नाही; 'परोपदेशे पांडित्यं' सारखा तो वाटतो. अत्याचाराचा सक्षम प्रतिकार करण्यासाठी खुद्द स्त्रीनेच व्यक्तिगत पातळीवर स्वतःचे मानस आणि स्वतःचा स्वतःकडे पाहण्याचा दृष्टिकोण यात बदल घडवून आणला पाहिजे. आपला उद्धार आपणच घडवून आणू शकतो, आपण आपले खरे शत्रू किंवा मित्र असतो, हे गीतावचन ('उद्धरेदात्मनात्मानम् नात्मानमवसादयेत्। आत्मेव ह्यात्मनो बंधुरात्मेव रिपुरात्मनः।') या संदर्भात खरे मार्गदर्शक वाटते.

'भाषेची चैतन्य लेणी' या लेखात लोकहितवादी, आगरकर, ताराबाई शिंदे (*स्त्री-पुरुष तुलना* हे त्यांचे १८८२ साली प्रसिद्ध झालेले पुस्तक) यांच्या साहित्यातील स्त्रीवादी उतारे दिले आहेत. ते तेवढे समर्पक व वस्तुस्थितीला धरून वाटत नाहीत. उदाहरणार्थ, "भले हिंदू हो... तुम्ही आपल्या मुलींचे खाटीक होता.... आजपर्यंत विधवा जाळिल्या तितक्या पुरे करा" हे लोकहितवादींचे विधान भावनेला आवाहन करणारे असले तरी वस्तुस्थितीस धरून नाही. या विधानावरून वाटते तितकी सतीची चाल सर्रास बोकाळलेली नव्हती; फारच मर्यादित स्वरूपात अस्तित्वात होती. म्हणून तर त्या काळी विधवा

विवाहाचा प्रश्न चर्चिला गेला. जरठकुमारी विवाहाबद्दलचे आगरकरांचे विधान असे आहे : "जाईची कळी निवडुंगावर किंवा सोनचाफ्याचे फूल कोरांटीवर आणून टाकण्यात काय शहाणपण व भूषण असेल ते असो!" "आगरकरांचे हे वाक्य जरठकुमारी विवाहातील भीषणता टिपणारे एक काव्य आहे" अशी प्रशंसा प्रतिभा रानडे करतात. भिन्न वनस्पती जातींचा समागम यात जरठकुमारी मीलनाचा आशय कसा येतो ते समजत नाही. (असलाच तर त्यात आंतरजातीय विवाहाचा आशयच अधिक प्रतीत होतो असे वाटते.). ताराबाई शिंदेंचे एक विधान लेखिकेला फारच आवडलेले दिसते. त्यामध्ये ताराबाई म्हणतात, "प्रीती काही आंबा, जांब नाही म्हणून वाटून घेता येईल. प्रीती ही केवळ दुधाप्रमाणे आहे. दूध एकदा नासले म्हणजे जसे त्याचे फिरून दूध होत नाही, ती प्रीती एकदा फाटली म्हणजे ती पुन्हा कधी जुळत नाही." या विधानाची स्तुती करताना लेखिका म्हणते, "असले प्रत्ययकारी समर्पक उदाहरण दिल्यामुळे एखादा नाठाळ वाचकही वठणीवर येईल, ताराबाईंचे म्हणणे पटवून घेईल याची खात्री वाटते." प्रत्यक्षात वरील विधान प्रत्ययकारी व समर्पक आहे का, याचा फेरविचार करणे जरूर आहे. आंबा, जांब असल्या वस्तूंत जास्त वाटेकरी आले की, प्रत्येकाचा हिस्सा कमी होतो. पण प्रेम अशी वस्तू आहे की ती दिल्याने वाढते; कमी होत नाही. दुसरे म्हणजे नासलेले दूध फिरून दूध होत नसले तरी ते नेहमीच टाकून द्यावे लागत नाही. त्यापासून चविष्ट व पौष्टिक पनीरसुद्धा बनवता येते. त्याचप्रमाणे, एकदा फाटलेली प्रीती जास्त प्रगल्भ परिपक्व अवस्थेत परिणत होताना अनेकदा दिसते. ताराबाई शिंदेंच्या उपरोक्त विधानाप्रमाणेच अमृता प्रीतम या श्रेष्ठ लेखिकेचे एक विधान प्रस्तुत पुस्तकात दोन ठिकाणी (पृ. १४८ व १५७) उद्धृत केले आहे, ते विधान असे आहे की, "बाई ही मळून ठेवलेल्या कणकेसारखी असते. घरात ठेवली तर उंदीर कुरतडतात, बाहेर ठेवली तर कावळे टोच्या मारतात." "किती खरे आहे हे!" असा या वाक्याचा गौरव करून लेखिका पुढे म्हणते, "पाश्चात्त्य जग कितीही सुधारलं, पुढं गेलेलं दिसलं तरी या 'उंदरांची' आणि 'कावळ्यांची' भीती जगभरच्या सगळ्याच बायांना वाटते." घरात वा घराबाहेर, कुठेही राहिलो तरी आपले जीवन असुरक्षित असते अशी अनुभूती क्वचित काही वेळी, काहीजणींना येत असेल, पण हा प्रातिनिधिक स्वरूपाचा अनुभव वाटत नाही.

नोबेल पारितोषिक विजेती टोनी मॉरिसन या अमेरिकन कृष्णवर्णीय लेखिकेने कृष्णवर्णीय स्त्रियांचे जे तत्त्वज्ञान मांडले आहे त्यामुळे खरोखरच 'ब्लॅक इज सुप्रीम' हे तिच्यावरील लेखाला लेखिकेने दिलेले शीर्षक सार्थ वाटते. एका मुलाखतीत टोनी मॉरिसन म्हणाली होती की, 'स्त्री म्हणून कृष्णवर्णीय व गौरवर्णीय स्त्रीचे अनुभवविश्व सारखेच असले तरी त्याबद्दलच्या त्यांच्या संवेदना वेगळ्या असतात. इतर लोकांना सर्वसामान्यपणे 'इव्हिल' (कुकर्म, पाप) याबद्दल जो तिरस्कार वाटतो, तसा तो कृष्णवर्णीयांना वाटत नाही. आपल्या जीवनाचा एक नैसर्गिक अविभाज्य भाग म्हणून त्यांनी 'इव्हिल'चा स्वीकार केला आहे. 'इव्हिल'ला नाहीसं करण्याऐवजी त्यापासून स्वतःचं रक्षण कसं करता येईल याचा विचार ते करतात. पापी माणसांना सतत पराण्या न लावता आपल्या जीवनाचा एक भाग म्हणून त्यांचा स्वीकार करतात." 'इव्हिल'बद्दलची ही मनोवृत्ती आपल्याला एका वेगळ्याच अध्यात्मिक पातळीवर घेऊन जाते.

'चुली मातीच्याच, तरीपण – ' या लेखात डॉ. बार्बारा ऱ्हेनरिच या अमेरिकन विदुषीची तेथील स्त्रीजीवनाविषयीची जी विधाने दिली आहेत त्यांमध्ये विसंगती आढळते. सुरुवातीचे एक विधान असे आहे की, "आता स्त्रीकडे एक 'सेक्स ऑब्जेक्ट' म्हणून बघितलं जात नाही. स्त्री ही एक सुंदर आकर्षक वस्तू आहे, असं आता कोणी समजत नाही." पण नंतर एका ठिकाणी त्या म्हणतात की, "कामाच्या ठिकाणी स्त्री म्हणून होणारा लैंगिक छळ, सतत वाढत जाणाऱ्या बलात्कारांची संख्या, हे आज अमेरिकन स्त्रियांसमोरचे महत्त्वाचे प्रश्न आहेत." तसेच सुरुवातीला एक विधान असे येते की, "अमेरिकन स्त्रिया आता स्वतःचे रक्षण स्वतःच करू लागल्या आहेत. त्यांना पुरुषाच्या रक्षणाची गरज वाटत नाही." लैंगिक छळ, वाढत जाणाऱ्या बलात्कारांची संख्या यावरून अजूनही तेथे स्त्रीकडे 'सेक्स ऑब्जेक्ट' म्हणूनच पाहिले जाते असे स्पष्ट दिसते. तसेच लैंगिक छळ ज्या नोकरीत होत आहे त्या नोकऱ्या सोडून त्यांना जर सन्मानाने जगता येत नसेल तर त्यांना दुसऱ्यांच्या रक्षणाची गरज नसते हे ऱ्हेनरिच बाईंचे विधानही निरर्थक ठरते.

'दारिद्र्याची समीकरणे' या लेखात झोपडपट्ट्यांमध्ये राहावे लागत असणाऱ्या बायकांविषयी लेखिका म्हणते, "तेथे राहणाऱ्या बायका अतिशय असुरक्षित जीवन जगत असतात. अतिशय कठोर अशा नीतीनियमांचे पालन त्यांनी केले तरच

त्या सुरक्षित राहतात. नाहीतर त्यांचं वाईपण धोक्यात येतं." महानगरीय झोपडपट्ट्यांचा अभ्यास करणाऱ्या मुंबईच्या स्त्री-हितकारिणी या संस्थेतील स्त्री-कार्यकर्त्यांशी चर्चा करताना त्यांचा याबाबतचा अनुभव भिन्न असल्याचे दिसून आले. त्यांच्या मते, झोपडपट्टीतील स्त्रिया पांढरपेशा स्त्रियांपेक्षा धीट व स्व-रक्षित वाटतात. नवऱ्याने टाकलेली स्त्री परित्यक्ता म्हणून न जगता सरळ दुसऱ्या पुरुषाशी घरोवा करून नांदू लागते. स्वतःची प्रतिष्ठा कशी राखायची हे त्यांना जास्त चांगले कळते. अशाच प्रकारचा अनुभव पुण्याच्या लोकमान्य नगर-जवळील दत्तवाडीच्या झोपडपट्टीतील स्त्रियांच्या मुलाखती घेणाऱ्या एका समाजशास्त्रसंशोधिकेनेही कथन केला.

'प्रश्न आहे तो दृष्टिकोणाचा' या लेखात लेखिकेने काढलेला निष्कर्ष अतिशय आग्रही व अतिरेकी स्वरूपाचा वाटतो. बलात्काराच्या बहुसंख्य खटल्यांत पुरुषाकडे सहानुभूतीने व बाईकडे शंकास्पद रीतीने पाहिले जाते असे विधान करून लेखिका असा निष्कर्ष काढते की, "त्यामुळे सळसळत्या रक्ताच्या तरुणांच्या मनात नको ते धारिष्ट्य येऊ शकते. नाही, ते आलेलेच आहे. आणि प्रत्येक स्त्रीचं जीवन आपण केव्हाही बलात्काराचा बळी होऊ शकतो या कुशंकेनं ग्रासून जातं – नव्हे जात आहेच." वस्तुस्थितीचा विपर्यास करणारे अशा प्रकारचे अभिनिवेशी लेखन सुज्ञ वाचकास हास्यास्पद वाटते.

'स्त्रियांची आत्मचरित्रे : न लिहिली गेलेली' या लेखात प्रत्यक्ष लिहिल्या गेलेल्या आत्मवृत्तांतामधूनही मानवतावादी समाजसुधारक नवरेसुद्धा आपल्या वायकोवर अन्याय करत असत असे दाखवले आहे. लेखिका म्हणते, "फुलामुलांचे कवी म्हणून ओळखल्या जाणाऱ्या ना.वा. टिळकांनी आपल्या पत्नीला कधीकधी मारले होते; स्वतःच्या घरसंसाराकडे ते अक्षम्य दुर्लक्ष करीत.... 'माझ्यामुळेच रमा शिकते आहे, सभासंमेलनांना जात आहे, तिला बोलू नका.' असे आपल्या आईला, वहिणीला सांगण्याचे धारिष्ट्य न्यायमूर्ती रानडे यांनी दाखविले नाही; किंवा बायाशी पुनर्विवाह करण्याची हिंमत दाखविणारे धों.के. कर्वे, (पण) आश्रम चालायला हवा म्हणून, बायाला अस्पृश्यासारखे आश्रमापासून दूर ठेवणारे कर्वे; यांच्या या वागणुकीवरून, कौटुंबिक आणि सामाजिक संकेतांना, परंपरांना बळी पडणारी ही मातब्बर माणसे कमकुवतच होती असे म्हणावेसे वाटते." लक्ष्मीबाई टिळक, रमाबाई रानडे आणि बाया कर्वे यांपैकी प्रत्येकीच्या वैवाहिक जीवनाचा समग्र विचार केल्यास आपल्या पतीबरोबरच्या सहजीवनामुळे त्यांचे व्यक्तिमत्त्व अनेक अंगांनी विकसित झाले; त्याचा त्यांना व समाजालाही लाभ झाला असे दिसते. प्रसंगी अन्याय सहन करूनही बारीकसारीक कौटुंबिक व सामाजिक संकेतांचे पालन केल्यामुळे जास्त महत्त्वाच्या व मूलग्राही समाजसुधारणेसाठी कुटुंबाचे व समाजाचे मतपरिवर्तन करणे शक्य होते हे या तिन्ही आत्मचरित्रांवरून स्पष्ट होते. या उदाहरणांवरून आजच्या स्त्रीवादी महिलांनीसुद्धा बरेच शिकण्यासारखे आहे. उदाहरणार्थ, स्त्रीवादी दृष्टिकोणातून आजकाल विवाहानंतर काही स्त्रिया नामांतर करण्यास विरोध करताना दिसतात, मंगळसूत्र घालायलाही काहींचा विरोध असतो. या क्षुल्लक गोष्टींमुळे सासरच्या घरामध्ये जर फार मोठा कडवटपणा निर्माण होणार असेल तर रानडे, कर्वे यांच्याप्रमाणे याबाबतीत वडीलधाऱ्यांना न दुखावता आपल्या व्यक्तिमत्त्वाच्या विकासाच्या खऱ्या गोष्टींची जोपासना करताना त्यांचे सहकार्य मिळविण्यास योग्य वातावरण-निर्मिती केली पाहिजे.

'एक अहिंसक शस्त्र' या लेखात दारुड्यांच्या छळवादाचा उबग येऊन त्यांच्या बायकांनी संघटितरीत्या अशा नवऱ्यांचे हातपाय बांधून, त्यांच्या तोंडाला काळे फासून, प्रसंगी त्यांची गाढवांवरून धिंड काढून त्यांची जी नाचक्की केली त्यामुळे घाबरून बहुतेकांनी दारू सोडली अशा प्रकारची काही उदाहरणे (महाराष्ट्रातील गडचिरोली येथील तसेच हिमाचलप्रदेश व आंध्रप्रदेशातीलही) देण्यात आली आहेत. सुधारणा घडवून आणण्याचे हे अहिंसक शस्त्र म्हणण्याऐवजी हिंसक शस्त्रच म्हणावे लागेल. आणि ते तात्पुरते उपयोगी ठरले तरी चिरस्थायी परिणाम करणारे होईलसे वाटत नाही. बालशिक्षणतज्ज्ञ ताराबाई मोडकांप्रमाणे, अतिदारुड्या नवऱ्याच्या बाबतीत नवरा मेल्यावर आपण जसे एकाकी जीवन जगतो तसेच, स्वतंत्र जीवन त्याच्याशी असहकार पुकारून आपल्याला जगता आले पाहिजे.

या संग्रहातील सर्वच लेखांमधून स्त्री-पुरुष सहजीवनाशी संबंधित विविध पैलूंचे विश्लेषण असेल असे या पुस्तकाची प्रस्तावना वाचून वाटते. प्रत्यक्षात तसे झालेले नाही. उदाहरणार्थ, लेख क्रमांक तीन, – 'म्युझियम्स; नव्हे आश्चर्याचे खजिने'; क्रमांक बावीस, – 'बाळहातांची गळामिठी'; क्रमांक एकोणतीस, – 'झुंडशाहीचे घातकी राजकारण', क्रमांक अडतीस, 'पिकनिक' आणि क्रमांक सात – 'दोन संस्कृती'च्या आवर्तात' हे लेख या संग्रहात अप्रस्तुत व विषयांतर करणारे वाटतात. उपरोक्त





अनुक्रमणिका

पहिल्या लेखात, लेखिकेला लंडनमधल्या ब्रिटिश म्युझियममध्ये पाहावयास मिळालेल्या, ऊर या शहराच्या उत्खननातील समृद्ध वस्तुभांडाराचे व थडग्यांचे रसभरित वर्णन वाचायला मिळते. 'मला स्वतःला दागिन्यांचे आकर्षणच नाही', असे आत्मनिवेदन करत लेखिकेने या लेखाचा निम्म्याहून अधिक भाग साडेचार हजार वर्षांपूर्वीच्या स्त्री-पुरुषांच्या अंगाखाद्यावरील दागिन्यांचे वर्णन करण्यात खर्च केला आहे. उपरोक्त दुसऱ्या लेखात, लेखनकाळात होऊन गेलेल्या भूकंपात मानवी स्वभावाच्या सुष्ट-दुष्ट प्रवृत्तींचे जे दर्शन घडले त्याचे वर्णन आहे. तिसऱ्या लेखात, दरवर्षी ठराविक काळी नागपूर-मुंबई प्रवासात बाबासाहेब आंबेडकरांचे अनुयायी म्हणविणारे स्त्री-पुरुष झुंडीने आगगाडीच्या डब्यांमध्ये घुसून अर्वाच्य शिवीगाळ आणि धक्काबुक्की करत प्रवाशांना कसे लुटतात त्याचे वर्णन आहे. 'पिकनिक' या लेखात टी.व्ही. वर पाहायला मिळणाऱ्या, पळून जाणाऱ्या मुलांच्या 'सक्सेस स्टोरीज'चे दुष्परिणाम दाखवले आहेत. 'दोन संस्कृतींच्या आवर्तात' या लेखात, देशांतर करणाऱ्यांना स्वदेश व परदेश दोन्ही ठिकाणी जो तुटलेपणा जाणवतो त्याचे दुष्परिणाम कथन केले आहेत.

प्रस्तुत पुस्तकाच्या पृ. १९५ वर बांगलादेशीय स्त्रियांच्या परिस्थितीविषयी जी माहिती आहे ती मन व्यथित करणारी आहे. ही माहिती लेखिकेला बांगला देशातील सुलताना कमाल या स्त्री-मुक्ती चळवळीच्या आघाडीच्या कार्यकर्तीच्या मुलाखती-मधून मिळते. या मुलाखतीत असे म्हटले आहे की, "घरसंसार आणि नोकरी असे दुहेरी कर्तव्य स्त्री पार पाडते म्हणून बांगला देशात काही ठिकाणी बायकांना दुप्पट पगार दिला जातो! दुप्पट पगार मिळवणारी बायको असेल तर पुरुष नोकरी सोडून घरीच बसतात... दुसरी गोष्ट म्हणजे स्त्रियांच्या विकासासाठी त्यांनी आर्थिकदृष्ट्या स्वावलंबी व्हावे म्हणून सरकार स्त्रियांना कर्ज देते, इतर सोयी-सवलती देते त्यामुळे तेथील पुरुषांमध्ये दोन-तीन-चार लग्नं करण्याची चाल आता पूर्वीपेक्षा वाढत आहे. कारण मग प्रत्येक पत्नीच्या नावे कर्ज, सोयी, सवलती मिळवून त्यांच्या जिवावर नवरे ऐषारामी, ऐदी जीवन जगतात." याच पुस्तकात पृ. १३२-३३ वर लेखिका म्हणते, "महाराष्ट्र सरकारने स्थानिक स्वराज्य-संस्थांसाठी तीस टक्के जागा स्त्रियांसाठी रोखून ठेवल्या. या तीस टक्के जागांवर कोणी शोभेच्या बाहुल्या, कटपुतळ्या निवडून आणल्या जातील आणि त्यांच्या मागे दडून खरे राजकारण करणारे पुरुषच असतील.... निवडणुकींसाठी पैशाचे भक्कम पाठबळ लागते. पैशाचे पाठबळ असणाऱ्या पुरुषांना स्वतः मागे राहून या तीस टक्के जागा काबीज करणे सहज शक्य आहे." पृ. १०३ वर अमेरिकन स्त्रीच्या परिस्थितीबद्दल लेखिका म्हणते, "कुटुंबप्रमुख म्हणून एकटीच बाई असण्याचं प्रमाण खूपच वाढते आहे. अविवाहित आयांवरचा आर्थिक व कौटुंबिक ताण वाढत आहे." एकंदरीत वरील तिन्ही उदाहरणांवरून असे दिसते की, स्त्रिया जितक्या स्वतंत्र होऊ पाहत आहेत त्याप्रमाणात पुरुषांनाच अधिक स्वातंत्र्य, मोकळीक मिळते आहे.

या लेखसंग्रहातील 'बिकट वाट वहिवाट' हा लेख समारोपाच्या स्वरूपाचा आहे. त्यामध्ये लेखिका म्हणते, "स्त्रीवादाचा नेमका विचार सर्वदूर पोहोचविणे हे मुख्य आणि महत्त्वाचे काम आहे." परंतु या लेख-संग्रहातील लेखांमध्ये त्या नेमकेपणाचा अभाव दिसतो. प्रस्तुत लेखसंग्रहातील काही लेखांच्या शीर्षकांवरून (उदाहरणार्थ, 'सर्वत्र मातीच्याच चुली', 'जगभरच्या स्त्रियांचे नाते') सूचित होणारा ध्वन्यर्थ 'Workers of the world unite; you have nothing to lose but your chains' असा वर्ग विग्रहाच्या स्वरूपाचा वाटतो. पण स्त्री-पुरुष नाते-संबंधाचा प्रश्न वर्गलढ्यासारखा नसतो. संघटित स्वरूपाच्या प्रयत्नांऐवजी प्रत्येक घरातील स्त्रीने पुरुषाशी असलेले आपले नाते आपल्या खऱ्या व्यक्तिमत्त्वविकासास मारक असेल तर शांततामय असहकार करून, बाहेर गाजावाजा न करता हे नातेसंबंध सुधारण्याचा प्रयत्न करणे इष्ट ठरेल. स्त्री-पुरुष नाते हा एकूणच मानवी नातेसंबंधाचा एक भाग आहे. योग्य व ठाम भूमिका, निर्भयवृत्ती, पण त्याबरोबरच क्षुल्लक बाबतीत तडजोडीची तयारी अशा समजूतदार आचरणा-मुळेच प्रत्येक स्त्रीला आणि पुरुषालाही खरे समाधान, स्वास्थ्य व शांती लाभू शकेल. स्त्री, मग ती साक्षर वा निरक्षर असो, मिळवती वा न मिळवती असो, गरीब देशातील वा श्रीमंत देशातील असो, निसर्गाने तिला अबला म्हणून नक्कीच निर्माण केलेले नाही. फक्त तिला आत्मभान आले पाहिजे. मग, विनोबांच्या भाषेत, आपण महिला म्हणजे महान शक्तिवाल्या आहोत याची प्रचिती तिला येईल आणि स्त्री-पुरुष संबंधात खरी शांतिमय क्रांती घडून येईल.

**






# पत्रव्यवहार

१.

*नवभारत*च्या डिसेंबर १९९७ च्या अंकात श्री. शरद् पाटील यांनी डॉ. कसवे यांच्या पुस्तकावर लिहिलेला लेख आहे. त्या लेखात श्री. पाटील यांनी कर्णाला कृष्णाने पांडवांकडे आणण्यासाठी राज्यावरोवर द्रौपदीचे प्रलोभन दाखवल्याचे सांगणारा जो श्लोक आहे त्यावद्दल विवेचन केलेले आहे. त्या विवेचनात श्री. पाटील म्हणतात की, "पण, प्रश्न आहे कृष्ण द्रौपदीच्या शीलाचा सौदा करीत होता का, हा." ह्या प्रश्नाचे श्री. पाटील यांनी एक उत्तर दिले आहे.

त्या योग्य उत्तराला आणखी एक जोड द्यायला हवी. त्या लेखात संबंधित श्लोकाच्या फक्त दुसऱ्याच चरणाचे श्री. कसवेकृत आणि कर्वेकृत भाषांतर आणि त्यावरील विवेचन आहे. 'कृष्ण द्रौपदीच्या शीलाचा सौदा करीत होता का?' या प्रश्नाच्या उत्तरासाठी श्लोकाचा पहिला चरणही विचारात घ्यायला हवा. पूर्ण श्लोक असा आहे : "राजन्यः राजकन्याश्च आनयन्त्वभिषेचनम्। षष्ठे च त्वां तथा काले द्रौपद्युपगमिष्यति।।"* म्हणजे, राजपुत्र आणि राजकन्या तुझ्याकडे अभिषेकसामग्री घेऊन येतील आणि द्रौपदी सहावी पाळी म्हणून तुझ्याकडे येईल.

* श्री. शरद् पाटील यांनी पान १९ वर लिहिले आहे की, "इरावती कर्वेंनी *युगान्त*मध्ये (१९७१) केलेले भाषांतर असे – '... पांडवातला सहावा म्हणून द्रौपदी तुझी होईल. (षष्ठं च त्वां तथा काले द्रौपद्युपगमिष्यति।') (पान २२०)" शरद् पाटील यांच्या लेखात वरील ओळीत महाभारतातला जो श्लोकचरण आहे त्यातील 'षष्ठं' हा शब्द मुळाबरहुकूम नाही. मुळात तो चरण पुढील प्रमाणे आहे : 'षष्ठे च त्वां तथा काले द्रौपद्युपगमिष्यति।' इरावती कर्वेंनीसुद्धा आपल्या *युगान्त*च्या पहिल्या आवृत्तीत 'षष्ठे' हाच शब्द टाकला आहे. ते काहीही असले तरी, पहिल्या आवृत्तीत 'षष्ठे' असूनही 'पांडवातला सहावा' असेच भाषांतर कर्वेंनी केलेले आहे. आणि ते भाषांतर मुळातल्या 'षष्ठे'ला सोडून वाटते. म्हणून शरद् पाटील यांनी यावावतीतली गफलत कोठे झाली याचा शोध घ्यावा ही विनंती.

आता हा सगळा श्लोक जर लक्षात घेतला तर कृष्णाने द्रौपदीच्या शीलाचा सौदा केला असे होते काय? एखाद्या स्त्रीच्या शीलाचा सौदा केव्हा होईल? एखाद्या माणसाकडून एखादे काम करवून घ्यायचे असेल आणि त्या कामाचा मोवदला म्हणून जर एखादी स्त्री शय्यासोबत म्हणून गुपचूपपणे आणि तात्पुरती, लग्नविग्न न करता, यायची झाली, तर त्या स्त्रीच्या शीलाचा सौदा झाला असे म्हणता येईल. तसा प्रकार या ठिकाणी द्रौपदीच्या वावतीत कृष्णाने केल्याचे आढळत नाही. कृष्णाने स्पष्ट म्हटलेले आहे की, अगोदर कर्णाला अभिषेक होईल. तो अभिषेकसुद्धा नोकराचाकरांकरवी नव्हे, तर राजपुत्र आणि राजकन्या यांच्याकडून होईल. म्हणजे हा सौदा चांगला प्रतिष्ठितपणे आणि वाजतगाजतच होणार. लवाजमा जमणार. अभिषेक म्हटल्यावर मंत्रविंत्र म्हणणार. त्या मंत्रविंत्रातून द्रौपदी आणि कर्ण यांच्या मिलनाला शुभेच्छा मिळणार, अभिष्टचिंतन-अभिनंदन यांच्यासकट आहेरांची देवघेव होणार. अशा प्रकारच्या कार्यक्रमाला शीलाचा सौदा करणारे काम असे म्हणत नाहीत; नवजीवनाचा प्रस्ताव म्हणतात.

असा प्रस्ताव सुचवणारा त्या श्लोकातील पहिला चरण कसवे यांनी का गाळला? शरद् पाटील यांनी कसवे यांचे जे अवतरण दिले आहे त्यात त्या श्लोकाच्या पहिल्या चरणाचा उल्लेखच नाही. कसवेंनी तो पहिला चरण गाळल्यामुळे त्यांच्यावरसुद्धा त्यांनी मे.पुं. रेगे यांच्यावर केलेला आरोप उलटतो. कसवे यांनी म्हटले आहे की, "रेगे वेशिस्त आहेत. ते एक शिस्तशीर वाचीत नाहीत, वाक्ये मध्येच तोडतात, संदर्भहीन वाक्ये उचलतात. ते वेजवाबदार आहेत." कसवेसुद्धा महाभारतातले उद्योगपर्व शिस्तशीर वाचीत नाहीत, श्लोक मध्येच तोडतात, संदर्भहीन चरण उचलतात. मग कसवे वेजबावदार ठरत नाहीत काय? कसवे नंतर म्हणतात की, "रेग्यांनी हे पुढचे वाक्य का गाळले?" मग कसवे यांनी तरी वरील श्लोकातील आधीचा चरण का गाळला? आणि क्रम पाहिला तर कसवे यांचे वेजबावदार आणि गाळणकार वाचन-

वर्तन पहिले आहे. म्हणून कसवे यांनी प्रथम स्वतःचाच न्यायनिवाडा करावा.

हे प्रकरण नुसत्या त्या श्लोकाच्या पहिल्या चरणापुरते नाही. कृष्णाचा प्रस्ताव हा द्रौपदीच्या शीलाचा सौदा कसा नाही हे पाहण्यासाठी त्या श्लोकाच्या आधीचा श्लोक वाचणे क्रमप्राप्त आहे. त्या श्लोकाच्या आधीच्या श्लोकात कृष्णाने म्हटले आहे की, "कर्णा, तू कुंतीचाच पहिला मुलगा म्हणून सहावा पांडव आहेस. तू आपल्या भावांकडे ये, ते तुलाच राज्यावर बसवून तुझे सेवक होतील." कसवे यांनी हा श्लोक वाचला की नाही? वाचला नसेल तर त्यांचे वाचन शिस्तशीर आहे काय? वाचला असेल तर मग त्या श्लोकाचा अन्वयार्थ त्यांच्या विवेचनात का नाही? कर्ण जर आपल्या भावांकडे आला तर ते भाऊ काय करणार म्हणून कृष्णाने सांगितले आहे ते नीट लक्षात घ्या. दुर्योधनाने कर्णाला वेगळे राज्य दिले, स्वतःचे राज्य दिलेले नाही. युधिष्ठिर मात्र कर्णाला स्वतःचे राज्य देणार आहे. नुसते राज्य देणार असे नव्हे, तर कृष्ण म्हणतो की, ते भाऊ कर्णाचे सेवक होतील. हे तर सर्वभावे समर्पण झाले. ह्या समर्पणाला कसवे शीलाचा सौदा असे कसे म्हणावयास धजले? त्या समर्पणाचा अपरिहार्य भाग म्हणूनच मग द्रौपदीचा विवाह कर्णाबरोबर झाला असता. कारण कर्ण हा पांडव ठरल्यामुळे मूळ कुंतीवचन पुन्हा लागू करावे लागले असते. मूळ कुंतीवचन असे होते : सगळ्यांनी मिळून द्रौपदीबरोबर विवाह करा. म्हणजे हे सगळे शिस्तशीर होणार होते. त्यात सौद्याचा भागच नव्हता. सौदा केव्हा म्हणता आले असते? जर कर्ण हा पांडव नसता, तो कौरव असता, किंवा सूतपुत्रच राहिला असता आणि तसा राहून मग द्रौपदीने चोरूनमारून कर्णाला सुखविले असते, तर! आणि तरच. एरवी नाही. पण कृष्ण तर स्पष्टच करतो की, कर्ण हा पांडव आहे. त्यामुळे पांडवांना जो अधिकार होता तोच अधिकार कर्णालाही स्वाभाविकपणे, साहजिकपणे मिळणार होता असे कृष्णाने म्हटले. 'सहज' कर्म, हा सौदा कसा म्हणता येईल?

किंबहुना, कृष्णाने कर्णजन्माचा हा जो गौप्यस्फोट कर्णाजवळ केला, तो गौप्यस्फोट जर कृष्णाने युधिष्ठिराकडे केला असता, तर कर्ण आपल्या भावांकडे येवो ना येवो, युधिष्ठिराने आपला राज्याधिकार कर्णाकडेच सुपूर्द केला असता. मग तो सौदा ठरला असता काय?

कसवे यांनी म्हटले आहे की, "रेगेंनी हा ग्रंथ सलग आणि गांभीर्याने वाचलेला नाही." मग कसबे यांनी तरी महाभारतातले, उद्योगपर्वातले ते दोन श्लोक सलग वाचले आहेत काय?

एथवर त्या दोन श्लोकांना धरून लेखनाचा आटापिटा केला. आता थोडेसे या प्रकरणासंबंधी अ.ज. करंदीकर यांनी लिहिलेला मजकूर वाचू. त्यांनी *महाभारताची पार्श्वभूमी – पश्चिम आशिया* नावाचा ग्रंथ लिहिलेला आहे. त्यात पान १२५ वर त्यांनी म्हटले आहे की, "आतापर्यंत द्रौपदी ही पाची पांडवांची पत्नी होती असा सामान्य समजुतीप्रमाणे उल्लेख केला असला तरी ती वस्तुतः युधिष्ठिराची पत्नी होती. आणि वेदकालीन रूढीप्रमाणे तिचे दीरही तिच्याशी समागम करीत. प्रचलित महाभारतातही (द्रौपदी) पाची पांडवांची पत्नी कशी बनली, या कोड्याचा उलगडा करण्याकरता अनेक आख्याने सांगितली असली तरी ती सारी आख्याने वेदकालीन रूढी विसरल्यानंतर आणि 'देवराच्च सुतोत्पत्तिः' हीसुद्धा कलियुगात वर्ज्य मानल्यानंतर रचलेली आहेत. या बनावट आख्यानांचा स्वतः महाभारताच्या कर्त्यांनाच वेळोवेळी विसर पडतो. धर्म आणि द्रौपदी यांच्या एकांतात प्रवेश करण्याचा दोष अर्जुनाकडून घडल्यानंतर स्वतः धर्मानेच बोलून दाखवले "गुरोरनुप्रवेशो हि नोपघातो यवीयसः। यवीयसोऽनुप्रवेशो ज्येष्ठस्य विधिलोपकः।।" (१.२०५.२७). म्हणजे ज्येष्ठ बंधूच्या पत्नीकडे तिच्या दिरांनी गेले तरी चालते. पण ज्येष्ठ बंधूने मात्र धाकट्या भावाच्या पत्नीकडे जाऊ नये. द्यूतसभेत दासी म्हणून ओढत नेलेल्या द्रौपदीला धृतराष्ट्राने वर देऊ केला असता तिने प्रतिविंध्याचा पिता युधिष्ठिर दास्यमुक्त व्हावा एवढीच मागणी केली. यावरूनही ती एकट्या युधिष्ठिराची पत्नी होती, असेच अनुमान निघते. कर्ण हा कुंतीचा कानीन पुत्र मानला तरी तो युधिष्ठिराहून वडील असल्याने पांडवांच्या पक्षाला मिळूनही विवाहधर्माप्रमाणे त्याला द्रौपदीशी समागम करता आला नसता. कृष्णशिष्टाईच्या प्रसंगी कृष्णाने कर्णाची भेट घेऊन त्याला द्रौपदीच्या प्राप्तीचा मोह दाखवून पांडवांच्या पक्षाला वळविण्याचा प्रयत्न केला. ही कथा म्हणजे महाभारतात सूतांनी केलेला एक घाणेरडा प्रक्षेप आहे, अशी माझी समजूत झाली होती. पण त्या कथेला पाश्चात्त्य देशातील एकशृंगासंबंधीच्या पौराणिक समजुतीचा आधार असल्याचे अकल्पितरीत्या उघडकीस आले. एक इंग्रज कादंबरीकार मि.टी.सी. व्हाईट यांच्या आर्थर

राजावरील ऐतिहासिक कादंबरीत एकशृंगाच्या शिकारीसंबंधी अशी माहिती आली आहे की, एकशृंग हरणाप्रमाणे भीरू आणि चपळ असल्याने त्याला एखाद्या मोहिनीचा मोह दाखवून त्याची शिकार करावी लागते. एकशृंगाला एकांतात एखादी (अखंड) कुमारी भेटली म्हणजे तो विश्वासाने आपले एकमेव शृंग तिच्या मांडीवर ठेवतो आणि ती मायाविनी एका हाताने त्याचे शृंग धरून दुसऱ्या हाताने लपून बसलेल्या भालेरावांना खूण करते. ब्राह्मणग्रंथातून वराहाला वाममोष म्हटले आहे. त्या कल्पनेचेच हे अतिशयोक्त रूपांतर असावे. किंवा वनातील वृक्ष हे इश्तर – द्रौपदीचे एक रूप असल्याने त्या रूपाने ती वराहाला भुलवीत असावी आणि त्या वृक्षातून आपले शृंग खूपसून त्याच्या शक्तीची परीक्षा करीत असताना वराहाला गाठून त्याची शिकार करण्याचा प्राचीन काली प्रघात असावा. या परंपरेला अनुसरून वराह-कर्णाचा वध करण्यापूर्वी त्याला एकवार द्रौपदीचा मोह दाखविण्याचा परंपरागत विधी कृष्णाने शिष्टाईच्या प्रसंगी पार पाडला असावा."

पाटील यांनी पान २० वर दुसऱ्या स्तंभात म्हटले आहे की, "स्त्रीपुरुषविषमतेबाबत दुर्योधन व कृष्ण यांचा विचारव्यवहार सारखा होता हे कृष्ण गीतेत स्त्रियांना वैश्य व शूद्रांबरोबर पापयोनी म्हणतो (९.३३) यावरूनही स्पष्ट होते."

गीतेतल्या नवव्या अध्यायातील तो बत्तीसावा श्लोक पुढील-प्रमाणे आहे. 'मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः। स्त्रियो वैश्यास्तथा शुद्रास्ते यान्ति परां गतिम्।।'

या श्लोकाच्या अर्थाच्या बाबतीत मतभेद आहेत. भाऊ धर्माधिकारी यांनी *गीता-चिकित्सा* हा ग्रंथ लिहिला आहे. त्यात पान ३५७ वर धर्माधिकारी यांनी म्हटले आहे की, "गीतेची चातुर्वर्ण्यव्यवस्था जशी असह्य तसाच गीतेचा स्त्री-विषयक दृष्टिकोणही त्याज्य आहे. गीतेत स्त्री ही पापयोनी मानली आहे; नव्हे, चातुर्वर्ण्यातील ब्राह्मणापासून शूद्रापर्यंत दर्जा समान, एकाच समाजपुरुषाचे ते अवयव असे सांगणारे शास्त्र वैश्य-शूद्रांनाही पापयोनीत ढकलते! स्त्री ही पापयोनी आहे असे गीता मानते. नवव्या अध्यायाचा ३२ वा श्लोक पाहा. त्यातील 'येऽपि स्युः पापयोनयः। स्त्रियो वैश्यास्तथा शूद्राः' या वचनाचा अर्थ, गीतेवरील भक्तीमुळे, टिळक, गांधी, विनोबा यांनी 'पापयोनीचे जीव आणि स्त्रिया-वैश्य-शूद्र' असा लावला आहे. परंतु तसा अर्थ दोन शब्दांमध्ये 'च' चे उभयान्वयी अव्यय असते तर बरोबर ठरला असता. तसे ते नसल्यामुळे ही केवळ अर्थाची ओढाताणच आहे. आहे या रचनेने शंकराचार्यांनी आपल्या भाष्यात जो अर्थ लावला आहे तोच बरोबर ठरतो. ते म्हणतात : 'पापयोनयः पाप योनिर्येपां ते पापयोनयः पापजन्मानः। के ते इत्त्याह स्त्रियो वैश्यास्तथा शूद्राः .....' (ज्यांचा जन्म पापी ते; ते कोण तर स्त्रिया, वैश्य आणि शूद्र)".

ह्या श्लोकाच्या अर्थाच्या बाबतीत दोन पक्ष पडलेले दिसतात. टिळक-गांधी-विनोबा यांनी एक अर्थ केला आहे. या अर्थाप्रमाणे स्त्रिया, वैश्य आणि शूद्र हे पापयोनी नाहीत. दुसरा अर्थ करणाऱ्यात भाऊ धर्माधिकारी आणि शंकराचार्य आहेत; आणि आता शरद् पाटील आहेत. या लोकांना वाटते की स्त्रिया (आणि वैश्य-शूद्र) पापयोनी आहेत. आणि या अर्थासाठी धर्माधिकारींनी आधार म्हणून असे म्हटले आहे की त्या ठिकाणी 'च' हे उभयान्वयी अव्यय नाही.

मला असे वाटते की, त्या श्लोकात 'च' हे उभयान्वयी अव्यय नसले तरी 'तथा' हे अव्यय उभयान्वयी अव्ययाचे काम करीत आहे. त्या अव्ययामुळे त्या श्लोकातले हे शब्द पुढीलप्रमाणे उच्चारात येतात. 'पापयोनी, स्त्रिया, वैश्य, त्याचप्रमाणे शूद्र'. आपण एरवीसुद्धा असे म्हणतो की, 'त्या ठिकाणी दगड, गोटे, माती त्याचप्रमाणे वाळू होती.' तथा ह्या अव्ययाचा असा अर्थ का करायचा नाही? आणखी एक बाब नीट लक्षात घ्या. धर्माधिकारी आणि शंकराचार्य यांनी पापयोनीवाल्यांची यादी स्त्री-वैश्य-शूद्र यांच्यापुरतीच केलेली आहे. ३२ व्या श्लोकाचा पुढचा श्लोक त्या दोघांनी (आणि पाटील यांनीसुद्धा) का लक्षात घेतला नाही? पुढचा म्हणजे ३३ वा श्लोक असा आहे : 'किं पुनर्ब्राह्मणाः पुण्या भक्ता राजर्षस्तथा। अनित्यसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम्।।९.३३।।'

आता पापयोनीवाल्यांच्या यादीत ह्या ३३ व्या श्लोकातील ब्राह्मण, पुण्यवान भक्त आणि राज-ऋषी ही मंडळीसुद्धा समाविष्ट केलेली आहेत. शंकराचार्य म्हणतात की, 'पापयोनयः पाप योनिर्येपां ते पापयोनयः पापजन्मानः। के ते इत्त्याह स्त्रियो वैश्यास्तथा शूद्राः ....' आता प्रश्न असा की, के ते इत्त्याह मध्ये स्त्रिया-वैश्य-शूद्र इथेच का थांबायचे? ३३ व्या श्लोकातला पहिला चरण काय म्हणतो ते का नाही जोडून घ्यायचे? तसे जोडून घेतले तर पापयोनीमध्ये स्त्री-वैश्य-शूद्र यांच्याबरोबर

ब्राह्मण, पुण्यभक्त आणि राजर्षीसुद्धा सामील होतील. पण हा असा सामीलनाचा अर्थ शंकराचार्य-धर्माधिकारी यांना मान्य होणार नाही. म्हणून पापयोनी हा शब्द स्वतंत्र घ्यावा. तो पहिला चरण तर स्पष्टपणे म्हणतो की, (म्हणजे पापयोनी, स्त्रिया-वैश्य-शूद्र, हे परम गतीला प्राप्त होतात,) तर मग ब्राह्मण, पुण्यवान भक्त आणि राजर्षी ह्यांच्या बद्दल काय बोलायचे (किं पुनः)? (म्हणजे ते सुद्धा परम गतीला प्राप्त होणारच होणार!) या बाबतीत दीड श्लोक मिळून एक अर्थ करावा लागतो.

शंकराचार्य, धर्माधिकारी (आणि आता पाटील) यांनी पापयोनीत स्त्री-वैश्य-शूद्र यांच्याबरोबर ब्राह्मण-पुण्यवान भक्त-राजर्षी यांनासुद्धा समाविष्ट का केले नाही, याचा उलगडा करण्याची जबाबदारी या ठिकाणी शरद् पाटील यांच्यावर येऊन पडली आहे.

शरद् पाटील यांनी पान २० वर द्रौपदीच्या विवाहाच्या कराराचे महाभारतामधील दोन श्लोक-संदर्भ दिले आहेत. (१.२११.२९, ३१) यातील ३१ वा श्लोक सापडला. पण २९ वा सापडला नाही. तो २९ वा श्लोक, म्हणजे एकेक वर्ष रहावेचा श्लोक कोणत्या आवृत्तीत, पानावर, विभागात आहे तो देण्याची कृपा करावी. मूळ संस्कृत श्लोकही द्यावा ही विनंती.

***देवीदास बागूल***
६५/२०, कृतांजली अपार्टमेंट्स,
एरंडवणा, पुणे ४११ ००४.

⁂

---

२.

प्रा. देवदत्त दाभोलकरांचे फडकेपरीक्षण वाचले. सांगता 'ब्राह्मण-ब्राह्मणेतरवाद गाडून टाका' याने झाली आहे. हा वाद जातिव्यवस्थाअंतावरून झालेला आहे. बुद्धकाळात ब्राह्मण वर्णजातीचे बरेच नेते भिक्षू व उपासक बनले, तरी उपासक बुद्धाला 'भो गोतम'च म्हणत राहिले. नंतर आजपर्यंतच्या काळात जातिव्यवस्थेचे अधिराज्य राहिल्याने हा वाद तीक्ष्ण होत गेला. जातिव्यवस्थाअंताचा दार्शनिक व व्यावहारिक पर्याय उभा न राहिल्याने एकूण समाजाचे वाढते ब्राह्मणीकरण होत राहिले आणि अब्राह्मणीकरण कुंठित झाले. डॉ. आंबेडकरांच्या नकारात्मक अब्राह्मणी अन्वेषणपद्धतीमुळे 'रिडल्स'च्या काळात भाजप-शिवसेना ओबीसींना खेचून घेऊन गेली. अयोध्या प्रश्नात ही प्रक्रिया वाढली. कम्युनिस्ट पक्षांनी युरोपीय समाजवादपतना-पासून बोध घेतला नाही आणि जातिव्यवस्थेबाबतची आपली नकारात्मक भूमिका – वैचारिक व व्यावहारिक – चालू ठेवली.

जातिव्यवस्थान्तक लोकशाही क्रांतीच्या आघाडीत सावरकरवाद्यांना सहभागी करून घेतले पाहिजे ही माझी मांडणी हा वाद कायमचा गाडून टाकण्यासाठीही होती. पण, ती प्रक्रिया *विधायक* अब्राह्मणी प्रबोधन व समाजपरिवर्तन स्वीकारण्यावरच अवलंबून आहे.

१.२.१९९८

***शरद् पाटील***
'असंतोष', धुळे ४२४ ००२.

⁂









अनुक्रमणिका

# साभार पोच

- **फिरस्तू** – अजित मिणेकर; सौ. सलोनी अजित मिणेकर, वॉर्ड नं. ९, घर नं. ५४४, कंजारभाट वसाहत, थोरात चौक, इचलकरंजी ४१६ ११५; प्रथमावृत्ती १९९७; पृष्ठे ६९; किं. रु. ७०/-.

- **राजनीती** – प्रकाश वाळ; श्रीविद्या प्रकाशन, २५० शनिवार पेठ, पुणे ४११ ०३०; प्रथमावृत्ती १९९७; पृष्ठे २४०; किं. रु. २००/-.

- **कबीर** – मंगेश पाडगांवकर; मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई ४०० ००४; प्रथमावृत्ती १९९७; पृष्ठे १४७; किं. रु. ८०/-.

- **सत्तांतर १९४७** – गोविंद तळवलकर; मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई ४; प्रथमावृत्ती १९९७; पृष्ठे २३४; किं. रु. १५०/-.

- **शारदासंगीत** – प्रकाश नारायण संत; मौज प्रकाशन गृह, खटाववाडी, गिरगांव, मुंबई ४; प्रथमावृत्ती १९९७; पृष्ठे १६१; किं. रु. १००/-.

- **साहित्यशास्त्रातील अध्यात्म-संकल्पना** – डॉ. म.दा. वरसावडे; सौ. विजया बह्मानंद पराडकर, २९९/६ कसबा पेठ, फलटण ४१५ ५२३.

- **समाज, विज्ञान आणि संस्कृती** – स.मा. गर्गे; समाज विज्ञान मंडळ, 'ज्ञानेश', १२०५/४, शिवाजीनगर, पुणे ४११ ००४; प्रथमावृत्ती १९९७; पृष्ठे ११५; किं. रु. ८०/-.

---

(६.१०.९७ पासून पुढे १०.१.९८ पर्यंत अभिप्रायार्थ आलेली पुस्तके)

- **नायिका** – रेखा देशपांडे; श्रीविद्या प्रकाशन, २५० शनिवार पेठ, पुणे ४११ ०३०; प्रथमावृत्ती १९९७; पृष्ठे २६५; किं. रु. २००/-.

- **अभिव्यक्ती** – संजय संगवई; मिडिया फॉर डेव्हलपमेन्ट, पंपिंग स्टेशन रोड, नाशिक ५; पृष्ठे १०८; किं. रु. २०.

- **केशवसुत** – वैदिक संस्कृतीचा आधुनिक उद्गाता प्राचार्य – डॉ. मुरलीधर जावडेकर; पुष्प प्रकाशन, ३०२ नारायण चेंबर्स, ५५५ नारायण पेठ, पुणे ४११ ०३०; प्रथमावृत्ती १९९७; पृष्ठे १८८+१४; किं. रु. २००.

- **हृदयस्पर्शी** – डॉ. सुमित्रा आपटे, डॉ. वसंत आपटे; शुभदा-सारस्वत प्रकाशन, ६७ पाटील इस्टेट, पुणे ५; प्रथमावृत्ती १९९७, पृष्ठे १८७; किं. रु. १००/-.

- **तारेवरची कसरत** – ललिता गंडभीर; श्रीविद्या प्रकाशन, २५० शनिवार पेठ, पुणे ४११ ०३०; प्रथमावृत्ती १९९७; पृष्ठे १७१; किं. रु. ४५/-.

- **दीपवा** – निरंजन उजगरे; भावना प्रकाशन, बी/१, वंदना सोसायटी, हायवे नाका, ठाणे (प.) ४०० ६०२; प्रथमावृत्ती १९९५; पृष्ठे ५६; किं. रु. ५०/-.

- **रानगूज** – शरद चुयेकर; अनिरुद्ध कुलकर्णी, कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर, पुणे ४११ ०३०; प्रथमावृत्ती १९९७; पृष्ठे ६९; किं. रु. ४५/-.

- **निव्वळ जिद्दीतून** – शब्दांकन सविता भावे; कॉन्टिनेन्टल प्रकाशन, विजयानगर, पुणे ३०; प्रथमावृत्ती १९९७; पृष्ठे १८७; किं. रु. १००/-.

अनुक्रमणिका

# वैशिष्ट्यपूर्ण व खास ध्येय असलेला एक उद्योग समूह



**शॉपिंग व कमर्शिअल कॉम्प्लेक्स 'रियाद', सौदी अरेबिया**

दूरदृष्टीच्या, द्रष्ट्या व्यक्तीने, म्हणजेच श्री. बी. जी. शिर्के यांनी शिर्के-सिपोरेक्स उद्योग समूहाची स्थापना केली. जेव्हा त्याची सुरूवात केली तेव्हाच, त्यांनी या उद्योग समूहाच्या संपूर्ण ध्येयाची आखणी केलेली होती. स्थापत्य-बांधकाम शास्त्राचे संपूर्णतः औद्योगिकरण करून तंत्रज्ञानाच्या दृष्टीने सर्वोत्कृष्ट व किफायतशीर किंमत असलेल्या दर्जेदार उत्पादनांव्दारे देशाच्या इमारत बांधकाम साहित्याची (मटेरिअल्सची) गरज भागविणे हेच उद्दिष्ट होते.

**आमचे मनुष्यबळ हीच आमची शक्ती :**

आम्ही स्थापत्य शास्त्रज्ञ, अभियंते, रचनाकार, रासायनिक, तांत्रिक, व्यवस्थापन आणि वित्त या सारख्या विविध क्षेत्रातील व्यवसायिक व कामगार मिळून नऊ हजाराहून अधिक व्यक्तींची नेमणूक केलेली असून त्यांच्या प्रशिक्षणाची व्यवस्था केली आहे. पुण्याजवळील मुंढवा येथील आमच्या ५३ एकराच्या प्लॉटमध्ये अत्याधुनिक संशोधन व विकासाच्या सोयी असलेले ९ अत्याधुनिक संपूर्ण सुसज्ज असे एकात्मिक कारखाने आहेत.

**आमची वैशिष्ट्ये :**

अत्याधुनिक पद्धतीने अति जलद गतीने, सर्वांना परवडण्याजोगी उच्च दर्जाची सर्व सोयी-सुविधा असलेली उपनगरे तयार करण्याचे आमचे ध्येय आहे. यासाठी आम्ही अशा मजबूत, त्वरीत उत्पादन करता येण्याजोग्या व परवडण्याजोग्या इमारत बांधकाम साहित्यांची अत्याधुनिक शास्त्र-तंत्राने निर्मिती करतो. बऱ्याच उत्पादनास भारतीय मानक संस्थेचा गुणवत्ता दर्जाप्रत ठरविण्याचा शिक्कामोर्तब आहे. तसेच बी. जी. शिर्के कन्स्ट्रक्शन टेक्नॉलॉजी लि. आय. एस. ओ. ९००१ व सिपोरेक्स इंडिया लि. आय. एस. ओ. ९००२ प्रमाणित कंपन्या आहेत. शिवाय सिपोरेक्स उत्पादनास भारतीय मानक संस्थेचा आय. एस. आय. शिक्कामोर्तब पण आहे. त्यामुळे आमची कामाची सर्वांगिण दर्जाप्रत, गती व किंमत सर्वांना परवडणारी असते. म्हणून देशात-परदेशात सर्वत्र आमच्या मालास मोठ्या प्रमाणावर मागणी आहे.

**आमचे सहभाग :**

आमचा स्वीडनच्या इंटरनॅशनेला सिपोरेक्स-अेबी, स्वीडन यांचेशी सहभाग आहे. तसेच आमच्या विविध उत्पादने व तंत्रज्ञानासाठी.



**सेंट्रल ॲथलेटिक स्टेडियम श्री शिवछत्रपती क्रीडा नगरी, बालेवाडी, पुणे**

अग्रगण्य कंपन्यांशी खालीलप्रमाणे तांत्रिक-सहकार्य आहे.
एल्बा, जर्मनी - ऑटोमेटिक वे-बॅचिंग व मिक्सिंग प्लॅन्टस, पोटेन एस.ए.
फ्रान्स - टॉवर क्रेन्स (१ ते ५० टनांची क्षमता, उंची १०० मीटर्स पर्यंत),
प्युराक स्वीडन - वेस्ट वॉटर ट्रीटमेन्ट प्लॅन्टस, रीड सिस्टीमस्, यु. एस. ए. - प्रगत जीआयसी ग्रेन स्टोरेज सायलो सिस्टिमस्

**आमचे मानाचे तुरे :**

● स्थापत्य-बांधकाम शास्त्राचे संपूर्ण औद्योगिकरण ● प्रिफॅब साहित्य ● टर्नकी लंपसम-एक रकमी वट्ट ठेका पध्दती ● एकाच छताखाली आरंभापासून ते पूर्णत्वापर्यंतच्या सर्व महत्वाच्या सेवा ● आधुनिक धान्य साठवणूक व त्यांचे संरक्षण, हाताळणी इ. कोठारांची निर्मिती, उभारणी व स्थापना (इन्स्टॉलेशन) ● ३०० दिवसात क्रीडा नगरीचे बांधकाम-एक जागतीक विक्रम.

**भविष्य-काळातील आमच्या योजना :**

स्थापत्य व बांधकाम शास्त्राच्या औद्योगिकरणाचा सर्वत्र प्रसार-प्रचार. प्रत्येकास निवारा मिळवून देण्याचा प्रयत्न. भारतातील जंगले व नैसर्गिक साधन-संपत्तीचे रक्षण व पर्यावरणाचे संतुलन साधणे इ. इ. महत्वाच्या कामात कार्यरत असलेली शिर्के-सिपोरेक्स ही एक अग्रगण्य संस्था आहे. आमच्या तंत्रज्ञानाने व क्षमतेने गुणवत्तेत वस्तुनिष्ठ दर्जा राखणे हे आमचे ध्येय. उद्याच्या भारताचा एक अंगभूत व अविभाज्य घटक म्हणून नावारूपास येण्याच्या आशेने व आत्मविश्वासाने आम्ही मार्गप्रतिक्षा करीत आहोत.




**SHIRKE शिर्के सिपोरेक्स उद्योग समूह SIPOREX**

७२-७६, मुंढवा इंडस्ट्रिअल इस्टेट, पुणे : ४११ ०३६. फोन : ६७०१५१, ६७०७५५. फॅक्स : (०२१२) ६७१६१२, ६७०३११
मुंबई : २६२४५७४/६७०३११, २६२४८९४. बॅंगलोर : २२७७३६०, २२७७३६१. दिल्ली : ६४६४०७६, ६४६२३०८.
हैद्राबाद : ८४१७३८, ८४६५०८. नागपूर : ५३३५११.




हे मासिक श्री.ग. दीक्षित यांनी मुद्रा, ३८३ नारायण पेठ, पुणे ४११ ०३० येथे छापून मे.पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.




